# स्मृतिचित्रांचें वैशिष्ट्य

**स्मृतिचित्रांत** असें आहे तरी काय, की ह भ प लक्ष्मणराव पांगारकरां-पासून मामा वरेरकरांपर्यंत व आचार्य प्र के अत्र्यांपासून प्रा दत्तो वामन पोतदारापर्यंत सर्वांनीं त्यांची मुक्तकंठानें स्तुति करावी? गोष्ट ऐकीव आहे पण इतर तशाच गोष्टी पाहतां ती अस्पष्ट कोठेंतरी नाहीं असें म्हणावें असेल. रत्नागिरीकडे एका अशिक्षित आजीबाईच्या हातीं स्मृतिचित्रें पडलीं त्यांचा नातू त्यांना तीं वाचून दाखवी पण मधूनच खेळायला बाहेर पळे शेवटीं त्यांनीं तीं स्वतःच वाचून काढण्याचें ठरविलें व श्रीगणेशा काढण्यास हातांत पाटीपेन्सिल घेतली

ह्या पुस्तकातील वैशिष्ट्याची यादी करायची झाली तर ती अशी होईल—

( १ ) स्मृतिचित्रें हा गेल्या अर्धशतकातला सामाजिक इतिहास आहे

( २ ) ह्यांतील सूक्ष्म विनोद अत्यंत हृदयंगम आहे त्यांत बोचकपणा यत्किंचितहि नाहीं कोणाहि व्यक्तीला त्या विनोदामुळें दुखविलेलें नाहीं लागण्यासारखें काहीं असेल त्या ठिकाणीं नावाचा उल्लेख केला नाहीं

वापरले नाहींत व कधीं अगाला बोट लावलें नाहीं " किंवा "सासुबाई वारल्यानंतर त्यांनीं दुसरें लग्न केलें नाहीं की इतर भानगडी केल्या नाहींत त्याचें वर्तन फार शुद्ध होतें "

( ५ ) कोणतेंहि शालेय शिक्षण न घेता अनुकूल परिस्थितीनें मन कसें सुसंस्कृत होऊ शकतें ह्याचें चित्र ह्या पुस्तकात दृष्टीस पडतें

( ६ ) भाषा ओघवती असून अकृत्रिम आहे तिच्यावर इंग्रजीचा किंवा संस्कृतचा पगडा नाहीं पांडित्य नाहीं नव्हे अन्वेषणा नाहीं त्यामुळें अगदीं बालबोध मराठी किती गोड असू शकतें ह्याचें हृदय येथें दिसतें ह्या भाषेचा चटका लागतो, कारण वाचणाराच्या मेंदूला यत्किंचितहि श्रम न पडता लेखनाचा भाव त्याला कळतो,—अनुभवता येतो

( ७ ) हें लिखाण हृदयातून स्फूर्त झालेलें लिखाण असल्यानें त्यात सजीवपणा आला आहे तें लिहिण्यासाठीं लिहिलेलें नसून आपोआप लेखणींतून बाहेर पडलें आहे असें म्हणता येइल आपण लिहितों आहों तें पुढें वाचलें जाईल, ही कल्पनाहि लेखिकेला तें लिहिताना नसल्यानें तें इतकें सहजपणें उतरलें आहे.

( ८ ) सत्य हें काल्पनिकापेक्षा अधिक अद्भुतरम्य असतें स्मृतिचित्राचा वर्ण्य विषय अत्यंत सजीव व रम्य आहे व तो सजीवपणा व रम्यपणा शोधण्याची दृष्टि लेखिकेला आहे ह्यामुळें तो आहे तसा वाचकापुढें आणला गेला

( ९ ) आणि सर्वांत मोठी व महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या वर्ण्य विषयाकडे संपूर्ण निर्विकार मनानें पाहाण्याची लेखिकेची दृष्टि ह्यामुळें आपल्या स्वत च्या रूपाचा सुद्धा उल्लेख करताना तिला गमत वाटली, " मला नवल वाटतें तें मी टिळकाना कशी पसत पडलें ह्याचें माझें रूप रग अगदीं बेताचेंच होतें, नाकी नाक डोळे जरी रेखीव नव्हते तरी ते होते व अगदीं जागच्या जागीं होते "

स्मृतिचित्राच्या लोकप्रियतेचीं काहीं कारणें वर दिलीं आहेत त्याहून निराळीं कारणें सुद्धा असू शकतील परतु मला जीं वाटलीं तीं येथें दिलीं आहेत आता **स्मृतिचित्राचा थोडा पूर्वेतिहासहि** येथें दिला पाहिजे

माझे वडील वारले तेव्हा त्याचें चरित्र मीं लिहिण्यास घेतलें त्यानीं आम्हाला बजावून सांगितलें होतें, कीं माझें चरित्र घडलें तर ते लिहा त्यात

माझ्या दोघावर पाघरूण टाकण्याचा मुळींच प्रयत्न करूं नका त्या आज्ञेनुसार मी त्यांचें चरित्र लिहिणार होतों व त्यासाठीं जमवाजमव करूं लागलो. आईला सांगितलें, तुझ्या आठवणी अगदीं प्रसंग घडले त्याप्रमाणें काहीं आडपडदा न ठेवता लिहून काढ, मला वाटेल तसतशा मी त्या उपयोगात आणीन आणि तिनें लिहिण्यास सुरुवात केली त्या प्रसिद्ध करण्याचा आमचा दोघाचाहि मानस नव्हता. पण पुढें त्या जेव्हा प. वा साहित्याचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ह्यांच्या नजरेस पडल्या, तेव्हा त्यानीं त्या आहेत तशा छापून काढण्याचा मला आग्रह केला व त्यांच्या चिरंजीवानीं त्या आपल्या संजीवनींतून प्रसिद्ध करण्यासाठीं आमच्या जवळून नेल्या ही झाली स्मृतिचित्राच्या लेखनाची व प्रसिद्धीची मूळकथा

प्रस्तुत संक्षिप्त आवृत्तीची मागणी असल्यामुळें ही काढण्यात येत आहे. मूळ चार पुस्तकातील १०१ प्रकरणाची २० प्रकरणें करून ती ६७० पानाऐवजीं १८७ पानात बसविलीं आहेत किंमतहि साडेसहा रुपयाची दोन रुपये झाली आहे. तेव्हा हें पुस्तक किंमतीच्या दृष्टीनें व आकाराच्या दृष्टीनें अधिक सुटसुटीत होईल अशी आशा आहे. संक्षेप करताना जुळणीसाठीं पुष्कळ ठिकाणीं मला माझ्या पदरचीं वाक्यें घालावीं लागलीं. तीं सारीं लहान टाइपात जुळविलीं आहेत. ठळक टाइपातील सर्व मजकूर मूळ आवृत्तींत आहे

देवदत्त नारायण टिळक

शान्तिसदन, नाशिक, १६ डिसेंबर, १९४०

# अनुक्रमणिका

– १ –

# माहेरीं

*ह्या कांहीं कांहीं आठवणी म्हणजे श्रुति होत. वडिलांना म्हणजे नानांना 'सोवळें' झालें होतें व त्या सोवळ्यामुळेंच घरांत जाच असे. ती सोवळ्याची गोष्ट अशी सांगतात —*

सत्तावन सालच्या बंडाची धामधूम. माझे आजोबा – म्हणजे आईचे वडील * त्र्यंबकेश्वरीं कोठीवाले होते. बंडाच्या धामधुमीचा फायदा आजोबांच्या वैऱ्यांनीं घेतला व सरकारी अधिकाऱ्यांच्या मनांत आजोबांच्या विरुद्ध कांहीं किल्मिष त्यांनीं उत्पन्न केलें. आजोबांचें व माझ्या वडिलांचें एकमेकांवर बापलेकासारखें प्रेम होतें. आजोबांना धरून नेण्यांत आलें व त्र्यंबकेश्वरींच तावडतोब फांशीं देण्यांत आले. नाना तेव्हां नाशकास होते, तेथें त्यांना ती बातमी कळली. त्याबरोबर ते उठून दूर – पंचवटीच्याहि पलीकडे तपोवनांत आंघोळीला गेले. इकडे आत्याबाई भावाच्या आंघोळीची तयारी करून बसली होती. पण नाना जे सकाळीं बाहेर गेले ते संध्याकाळीं दिवेलागणीला ओलेत्यानें घरीं आले.

त्यांना कोणीं विचारलें, नाना तुम्ही होतां कोठें ? आणि असे ओलेत्यानें का घरीं आलां ? तसें त्यांनीं उत्तर केलं, मी तपोवनांत गेलों होतों, तेथें एका महाराचा शितोडा माझ्या अंगावर उडाला आहे. मला विटाळ झाला आहे. आता दुरून माझ्या अंगावर पाणी घाला. मी आंघोळ करतों.

हें सोवळें, शेवटपर्यंत म्हणजे पचवीस सव्वीस वर्षे कायम राहिलें.

ह्या सोवळ्यानंतर बारा तेरा वर्षांनीं माझा जन्म झाला.

नानांच्या सोवळ्यानें नुसतें घरदारच नाहीं, तर सारा गांव त्रासून गेला होता. त्यांना ब्राह्मणाचासुद्धा विटाळ व्हायचा ! मग इतरांची काय कथा ? घरांतील बायकांना हळदीकुंकवाहून परत घरीं येतांना न्हाऊन घरांत यावें लागे. स्वैंपाकघरांतहि नानांची करडी नजर असे. स्वैंपाक ओलेत्यानें व तोहि उजव्याच हातानें झाला पाहिजे. एक हात मोडल्याप्रमाणें बाजूस राहिला पाहिजे. आणि हें काम पडे आईवरच. कोणी शेजारी घरीं आला – आणि अर्थात् शेजार ब्राह्मणाचाच असावयाचा – तर तो परत जातांना आईनें त्याच्या मागें पाणी शिंपडीत जावें !

---

* वासुदेव भगवंत जोगळेकर

पण नाना एकदा सकाळीं बाहेर गेले म्हणजे मग मात्र आमची सर्वांची मजा असे. ते गेले, कीं शेजारच्या बायका आमच्या घरीं दमायला येत. आम्हीहि पोरेंसोरें खेळायला गोळा व्हायचीं. आई तर माणसांची फार भुकेली. तिनें दुसऱ्यांच्या मुलांना आंघोळी घालाव्या, सासुरवाशणींच्या सनतुती घालाव्या, कोणाला औषधें द्यावीं, कोणाशीं गोड बोलावें; एकदा तर एका मराठ्याच्या घरीं जाऊन तिनें तेथें पुरणाच्या पोळ्या करून दिल्या होत्या!

पण हें सारें अगदीं चोरून! नानांचें राज्य म्हणजे निराळेंच होतें. बाहेरून येणाऱ्या सर्व जिनसा ते धुऊन घेण्यास लावीत. मग तें मिठासारखें असलें तरी धुवावें लागे. एकदा त्यांनीं मुलांना मीठ धुण्यास सांगितलें. पोरांना नानांची खोड मोडायचीच होती. त्यांनीं मीठ एका पंचांत घालून चांगलें भिजविलें व तो पंचा खुंटीला टांगून ठेवला. थोड्याच वेळांत मीठ विरघळून गळून गेलें. नाना झोळींत मीठ पाहातात तों आत कांहीं नाहीं! तेव्हांपासून मीठ, गूळ, साखर, तेल, तूप ह्या जिनसा धुतल्यावांचून घरांत घरूं लागल्या.

हीं जिनसा धुण्याचीं कामें बहुतकरून आई व आजी ह्यांच्यावर पडत. ते मांगलीत त्या जिनसा त्या धूत किंवा धुतल्याचा बहाणा करीत. मीठ, साखर धुण्याचें काम जोंपर्यंत आई किंवा आजीकडे असे तोंपर्यंत तीं कधीं विरघळलीं नाहींत! त्या पुष्कळ वेळेस या धुण्याच्या बाबतींत लबाड्या करीत व आम्हांलाहि खोटें बोलण्यास शिकवीत. त्याचें कारणहि तसेंच होतें. शेतांतून धान्य घरीं आलें कीं तें सांठवावयाच्या आधीं धुतलें पाहिजे असा नानांचा कडक नियम असे. आतां, वीस वीस मण धान्य आईनें व आजीनें कसें धुवायचें? त्या काय करीत, कीं थोडेंसें धान्य धुऊन त्याचा थर सर्व राशीवर घालीत. नाना घरीं आले म्हणजे त्यांनीं सर्व मुलांच्या जबान्या घ्याव्या. मुलें मात्र आधींच पढवून ठेवलेलीं असावयाचीं. तेव्हां तीं बहुतकरून सारखीच गोष्ट सांगत. पण जर का एखादा घाबरून चुकला—म्हणजे खरें बोलला—तर सान्या घरांत गोंधळ सुरू व्हावयाचा! बायकांनीं तेवढ्या सगळ्या विटाळलेल्या वस्तु नानांच्या नजरेखालीं धुऊन काढायच्या, पोरांनीं खोटें बोलल्याबद्दल रगडून मार खायचा व पोरांना मारून आल्यावर त्यांच्या विटाळाबद्दल नानांनीं पुन्हा आंघोळ करायची!

एकदा घरांत जांबाच्या तीन पाट्या पडल्या होत्या. वास्तविक त्या आमच्या शेतांतून म्हणजे जळगावाहून नानांस विकायला यायच्या—पण त्या विटाळल्या

शेण्या! धुतल्या नव्हत्या! नाना सकाळीं बाहेर जात ते अगदीं अंधार पडेपर्यंत हातपाय धूत व आंघोळ करीत बसत. संध्याकाळपर्यंत आम्हांला मोकळीक असे. संध्याकाळपर्यंत त्या पाळ्यांतील जांब उचलून खावेत कीं नाहीं ह्याच्यांतच सारा वेळ गेला. शेवटीं ठरलें कीं एकेकानें दाराशीं पाळीपाळीनें उभें राहावें व बाकीच्यांनीं जांब खावेत. होतां होतां मीच एकटी राहिलें. पण माझ्या वेळेस कोणी दाराशीं उभें राहीना. तेव्हां मीच आपली दारापर्यंत गेलें व कोणी नाहीं असें पाहून जांब उचलून खाऊं लागलें इतक्यात नाना येऊन माझ्या पुढ्यांत दत्त म्हणून उभे राहिले! त्याना पाहातांच मी जीव घेऊन पळालें ती कोपऱ्यातील मुसळ्यामागें लपलें! नानांनी मागील दारीं जाऊन शिंदाफळीचा एक चांगला फोक काढून आणला व मला मुसळ्यामागून ओढून यथेच्छ चोप दिला. माझा मार पाहून बिचाऱ्या आजीला अतोनात वाईट वाटलें. घरातील इतर माणसांची पाचावर धारण बसली. त्याना भीति पडली, कीं आतां जर ही पोरगी नावें सांगू लागली तर सान्याना मार बसूनच्या बसून घर संपूर्ण घरदार धुवावें लागणार तें निराळेंच!

एक दिवस मी गव्हाच्या राशीजवळ निजले होतें. जवळच माझी एक बाहुली पडली होती. त्या बाहुलीला मी लुगडें नेसविलें होतें. खेळता खेळतां मला लागली झोप. बाहुलीचें लुगडें गव्हाच्या राशीला व मला लागलें होतें. नाना आले. त्यानीं तें पाहिलें. बाहुलीच्या लुगड्यानें गहूं विटाळलेले पाहाताच त्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्यानी मला खसकन् ओढली व चांगला मार देण्यास सुरवात केली. माझ्या मधल्या बहिणीला व भावालाहि कसलासा विटाळ झाला होता. मार देऊन झाल्यावर मला त्याच्याबरोबर गंगेवर * आंघोळीला पाठविलें.

गंगेवर जाता जातां आम्ही तिघानी ठरविलें कीं आज कोणीं तरी पाण्यांत बुडून मरायचें. असें कोणी मेलें म्हणजेच नानांचे डोळे उघडतील व ते कोणाला त्रास देणार नाहींत. आम्ही तिघें गंगेंत बुडूं लागलो सर्वांचा बेत एकच, कीं नानाना चांगली दहशत बसवायची मला तर मारच बसला होता. तेव्हा नानाची खोडकी चांगली जिरविण्याचा हा बेत पार पाडण्याचें मीं पक्केंच ठरविलें होतें. मी थकलें. नाकातोंडात पाणी जाऊं लागलें. त्याच वेळीं आमच्या समोर

---

* नाशकास गोदावरीला गंगा म्हणतात

शेजारचे एक गृहस्थ सध्या कीत बसले होते त्याचें माझ्याकडे लक्ष जाऊन त्यानीं चटकन् गंगेंत उडी मारली व मला बाहेर काढली ! नानाची खोड तर मोडली नाहींच पण माझी मात्र पुरी खोड मोडली

एकदा वसुलाचे शभर दोनशें रुपये आले होते ते अंगणात ठेवून त्यावर शेणाचा पोह टाकला व नाना गेले आपल्या नित्य व्यवसायाला म्हणजे आंघोळीला साऱ्या दिवसभर आम्हा पोराना त्या शेणाच्या पोहाभोवतीं पहारा ठेवण्याचें काम करावें लागलें संध्याकाळीं नाना घरीं आल्यावर ते रुपये धुण्यासाठीं गंगेवर घेऊन गेले ! ते तेथेंच विसरून आले ! गेले ते रुपये !

सारांश, या सोवळ्याओवळ्याच्या पायीं नानानीं सोनेंनाणेंसुद्धा धुण्याचें कमी केलें नाहीं !

*　　　*　　　*

गोविंदराव खांबेटे हे माझ्या आत्याबाईंचे पति गोविंदरावमामा माणसाचे फार भुकेले गाव अगदीं लहान व घर सदा सर्वांना उघडें त्यामुळें तेथें माणसाची सारखी वर्दळ असे नानाना सोवळें झाल्यानें गोसल्याच्या घरचें सर्व काहीं मामानाच पाहावें लागे त्याची शेतीवाडी, देणें घेणें, लग्न मुंजी, वगैरे सर्व भार त्यानीं आपल्या शिरावर घेतला होता आत्याबाईंना मूलबाळ मुळींच नव्हतें आईनें त्याना कबूल केलें होतें, कीं आता हा येणारा मुलगा होवो, मुलगी होवो, ती तुमची त्या दोघी आपल्या वचनाला जागल्या व मी जवळ जवळ आत्याबाईंच्याच घरीं वाढलें असें म्हणण्यास हरकत नाहीं तसें म्हटलें तर माझीं सारींच भावंडें त्याच्या घरीं वाढलीं मुलाना आपलें सत्तेचें घरसुद्धा तितकें आवडत नसे

आम्ही एकंदर पाच भावंडें सहा झालीं पुष्कळ, पण जगलीं पाच वडील थोरली भिकूताई, मग केशव, भागीरथी, विष्णु व शेवटली मी भिकूताई माझ्यापेक्षा पधरा सोळा वर्षांनी वडील होती तिला नाशकास पेंडशांच्या घरीं दिली होती नानासाहेब पेंडशांचें आमच्याकडे फार लक्ष असे त्याच सुमारास नाशकास टिळकांची कीर्ति म्हणून प्रसिद्धी होऊ लागली होती पेंडशांचें टिळकांकडे लक्ष होतें त्यानीं गोविंदरावमामाना माझ्यासाठीं ह्या स्थळाविषयीं लिहिलें गोविंदरावमामानीं वामनराव टिळकांशीं पत्रव्यवहार सुरू केला व मुलीला पाहाण्यासाठीं त्याना बोलाविलें वामनरावांचें पत्र आलें कीं "मी हुंडा घेऊन

आपल्या मुलाला विसरणार नाहीं. जें तुम्हांला करतां येईल तें तुम्ही करा. मला जें करतां येईल तें मी करीन टिप्पण मात्र चांगलें जुळलें पाहिजे. त्याशिवाय मी संमति देणार नाहीं. तसेंच माझ्या घरांत कोणी बायको माणूस नाहीं, तेव्हां मुलगी मोठी होईपर्यंत ती तुम्हांलाच सांभाळावी लागेल. मला पाहण्याची गरज नाहीं. तेथील सर्व मंडळींना ती पसंत असली म्हणजे झालें. मला पसंतच आहे."

हें पत्र वाचून सर्वांना आनंद झाला. मोठी होईपर्यंत मला सांभाळण्यास मामा अगदीं एका पायावर तयार होते. आतां मला एकदा नाशकास नेऊन दाखवून आणण्याचें तेवढें राहिलें होतें. त्याप्रमाणें नाशकास माझ्या वहिणीकडे माझी रवानगी झाली.

मला पाहायला आले, त्याच्या आधींची काहीं दिवसापूर्वींची गोष्ट गोविंदरावमामा तेव्हा नाशकास होते मीहि अर्थात् त्यांच्याचकडे होतें. जवळच त्यांच्या शेजारी एक बिऱ्हाड आलें होतें

त्या घरीं सखू नांवाची एक मुलगी सासुरवाशीण माहेरपणाला आलेली होती. बारा तेरा वर्षांची व घरांत तीच तेवढी बायको माणूस. पुरुष माणसें म्हणजे तिचे दोन वडील भाऊ. एक इंग्रजी पांचवींत व एक सहावींत शिकत होता.

सखू खेळतां येईल तितकें खेळत असे. मीहि नेहमीं तेथें खेळायला जावयाची. आमच्या खेळण्यानें सखूला चुलीशीं लागावयाला उशीर व्हायचा. तिचीं भावंडें त्रासून रागावून तशींच उपाशीं झोंपीं जात. तेव्हा वडील भावानें स्वत:च तिच्याशीं खेळण्यास सुरवात केली. ताई मुली जमवून खेळत बसते आणि मग सगळ्यांनाच उपाशीं बसण्याची पाळी येते, त्यापेक्षा आपण स्वत:च खेळूं लागावयाचें व शेजारच्या कार्टी आल्या कीं त्यांना हाकलून लावावयाचें. असा त्यानें निश्चयच केला. सोंगट्या सागरगोटे वगैरे सगळेंच तो खेळे

त्या घराला दोन जिने होते मी रोजच्याप्रमाणें खेळण्यास गेलें. तेव्हां सखूच्या भावानें मला पाहतांच काठी घेऊन एक जिना अडवला.

" खबरदार आमच्या घरात आलीस तर! तंगडीच मोडीन!"

वरून सखू हाका मारीतच होती. तेव्हां मी दुसऱ्या जिन्यावरून चढूं लागलें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. तेथून पुनः शब्द आला, " पाहा, लंगडी होऊन घरीं जावं लागेल!"

नाटक पाहायला तुमचीं तोंडें वशानें नाहीं बंद होणार " मामा खरोखरच त्या रात्रीं गुपचुप नाटक पाहायला गेले आपले श्वशुर गर्दीत बसलेले असतील ह्याची टिळकांना कल्पनाहि नव्हती राम वनवासाला निघाले आहेत आणि दशरथ शोक करीत आहे असा प्रवेश होता टिळक स्वतःच्या कविता रचून त्या गाऊ लागले प्रेक्षक रडू लागले टिळकांच्या हयातींत काव्यगायनाची प्रथा पडलेली नव्हती पण त्यांनीं आपलें काव्यगायन अशा रीतीनें त्या वेळीं सुद्धा केलें मामाच्या डोळ्यांतून अश्रु वाहू लागले व त्यांतच त्यांचा क्रोधाग्नि विझून गेला!

मामाचा क्रोधाग्नि विझला खरा पण आत्याबाईंची वीज कडकडावयाची होती ती कडाडलीच

टिळक संध्याच करीत नाहींत, संध्येचें मांडून ठेवलें म्हणजे ताम्हनात पाणी ओतून ठेवतात व भस्म लाऊन टाकतात असा आत्याबाईंनीं टिळकांच्याबद्दल गावात बोभाटा करावा तर टिळकांनीं उलट सांगावें कीं सासू फार वाईट, सासरा फार चांगला तो मादया अंगावर पांघरूण घालतो व ती पायरोंकडून फाडून घेते!

ह्या धुसफुशीमुळें शेवटीं टिळकांनीं जलालपूर सोडण्याचें ठरविलें मला घेऊन ते नाशकास आले चार दिवस आम्ही नाशकास राहिलो पण चारच दिवसांत नाशिकचा कंटाळा आला पुन्हा परत जलालपुरास जावेंसें वाटू लागलें

आता प्रश्न आला चार कोस पायीं मला न्यायचें कसें? मग केलें एक घोडें पण टिळक पायीं व मी घोड्यावर ह्याला मी कबूल होईना! शिवाय मला घोड्यावर बसावयाचें भयहि वाटत होतें ते म्हणाले, "आपण दोघेंहि बसू घोड्यावर" पण दोघांनीं एकदम घोड्यावर बसायची लाज वाटू लागली त्यांनीं माझी समजूत घातली, "बाजारची वेळ गेली आहे टळून, कोणी भेटणारच नाहीं वाटेनें कोणी भेटलेंच तर सांगू आपण दोघां आहो!" माझी समजूत पटली! व आम्ही दोघें घोड्यावर बसून चालू लागलो आळंदीजवळ गावचा न्हावी भेटला आम्हाला पाहून तो मोठमोठ्यानें हसू लागला! "अहो जावईबुवा, ही वरात छान काढलीत!" असें त्यानें हसता हसता म्हटलें आम्ही दोघें लाजून खालीं उतरलो न्हाव्याच्या हातावर आम्यारा आणे पडले कोणाला सांगणार नाहीं असें त्यानें कबूल केलें घोड्यावर आम्हीं टाकलेली गोधडीहि त्याला अर्पण केली कारण ती जलालपुरास न्यायची कशी? घोड्यावर

असून न्हावीबोवांनीं आपला नाशकाचा प्रवास सुखानें केला व आम्ही गोविंदरावमामांच्या दारीं पायीं पायीं येऊन उभीं राहिलों.

आमचें स्वागत स्तम्भपर्णेच झालें! दोनचार दिवस घरांत मुक्याचें व्रत होतें. मग हळू हळू आत्याबाईंचा ज्वालामुखी पेट घेणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं व शेवटीं जें व्हावयाचें तें झालेंच. मामाहि आतां आत्याबाईसारखेंच बोलूं लागले. संसारांत टिळकांचें लक्ष नाहीं असें दोघांचें म्हणणें. शेवटीं टिळक रुसले व मला टाकून निघून गेले.

गंगापुरापर्यंत ते अगदीं जोरानें गेले. पुढें गति कमी झाली. वाटेंत भेटले गोपाळभट. हे जलालपुरचे ग्रामजोशी. त्यांच्या अत्याग्रहावरून आपला राग विसरून टिळक जलालपुरला परतले!

ह्या वेळेस माझे वडील बंधु केशवरावमामा ह्यांनीं टिळकांचें स्वागत केलें.

"का? साल्लांत पुन्हा सुरड कानोला?"

"छे रे, मी कुठें येत होतों! गोपाळभटानें मला आणलं!"

"अग अग म्हशी मला कां ग नेशी असच झालं म्हणायचं!"

टिळक हसले. त्याचे मेव्हणेहि हसले.

पण ह्यानंतर आम्हाला जलालपुरास फार दिवस राहाणें शक्य नव्हतें. जावयाचें संसारात लक्ष नाहीं, हें निरुत श्राद्ध घेऊन सव्यअपसव्य करीत बसण्याची वेळ आली आहे, वगैरे आत्याबाईंचे शब्द दुसऱ्याकडून टिळकाच्या कानीं गेले व जलालपुर सोडून नाशकास जाण्याचा पुन्हा विचार ठरला.

विचार अमलांत आणावयास टिळकांना फारसा वेळ लागत नसे. लगेच त्यांनीं नाशिकचा रस्ता धरला व ते नाशिक येथें पंचवटींत उतरले. पुढें कांहीं दिवसानीं त्यांनीं तेथें एक खाजगी इंग्रजी शाळा काढली व आमचा संसार अशा रीतीनें सुरळीत सुरू झाला.

---

तेव्हांपासून सखूच्या घरीं जावयाचें नाहीं व तिच्या त्या भावाचें तोंड पाहावयाचें नाहीं असा मीं निश्चय केला. पुढें सखूचें निम्हाट उमामहेश्वराच्या देवळांत, म्हणजे आमच्या घराच्या अगदींच जवळ आलें, तरी मी काहीं तिच्या घरांत पाय घातला नाहीं असो

मला पाहायला आले तेव्हा भिकूताईनें नटवून थटवून मला वर माडीवर नेलें. तेथें मात्र मला मेल्याहून मेल्यासारखें झालें. कारण सखूच्या घरीं पाय न घालण्याचा माझा जो निश्चय तो ढासळण्याचा मजवर प्रसंग आला! माझी तंगडी मोडण्यास निघालेले गृहस्थच मला पाहायला आलेले! आणि त्याना मी पसंतहि पडलें! माझ्या आजेसासूबाईंच्या परीक्षेंतहि मी उतरलें. गंगामाईंनी माझ्या डाव्या कानाचा चाप गच्च दाबून पाहिला व सांगितलें, मुलगी मला पसंत आहे! कान दाबला तरी मीं हुश्श केलें नाहीं कीं इश्श म्हटलें नाहीं त्यावरून पोरीचा कान धरून आपण तिला घरींहि थांबवूं असा त्यांनीं अंदाज बांधला असावा

पण मला नवल वाटतें तें मी टिळकाना कशी पसंत पडलें याचें. माझें रूप, रंग अगदीं बेतांचेच होतें. यांशी नाक डोळे जरी रेखीव नव्हते तरी ते होते व अगदीं जागच्या जागीं होते. )

काहीं नाहीं तरी मामानीं माझ्या लग्नांत एक हजार रुपये खर्च करण्याचें ठरविलें. माझे चुलते नारायणराव गोखले हे काय करणार तें दिसतच होतें. आईला पुष्कळ वाटे पण ती बिचारी काय करणार? ती दुसऱ्याकरता जन्मभर खपली व निश्याकरता तिम्हे रुपत. मामाकडे सजल नेत्रांनीं पाहून आपली कृतज्ञता व्यक्त करण्यापलीकडे तिला काय करता येत होतें? नाना अगदीं लग्नाच्या गडबडींत रानांत जाऊन हातपाय धूत बसले होते! लग्न झालें. मामानीं कन्यादान केलें.

* * *

गोविंदरावमामाचें आमच्या जावयावर अगदीं बापाप्रमाणें प्रेम होतें. ते म्हणत, "माझें आहे काय? मनी ही माझी एकुलती एक मुलगी. पुढें मागें माझें जें आहे तें सारें मनीचें नि टिळकांचेंच आहे."

पण आत्याबाईंचें पाहणें निराळें असे. जावयाला नेहमीं कामधंद्यावांचून घरांतच डांबून ठेवलें, तर ह्यांचें पुढें व्हावयाचें कसें, ह्याच मतभेदामुळें त्या नवराबायकोंत नेहमीं खडाजंगी उडे.

जलालपुराजवळच गंगापूर आहे. दोहोंमध्यें नदी तेवढी आडवी. गंगापूर जलालपुरापेक्षां मोठें, श्रीमंत व हौशी गांव. तेथें दशावतारी नाटकें होत. त्या गांवांत विठूरांना मित्रमंडळी व त्यांच्या कवितेचे रसिक श्रोतृगणहि बरेच मिळाले होते. त्यांच्या आग्रहानें व स्वतःच्याहि हौसेनें त्यांनीं ह्या नाटकांत काम करण्यास सुरुवात केली. पण हें सारें अगदीं चोरून! गोविंदरावमामांच्या कानीं ह्यापैकीं कांहीं जाऊं न देण्याची सर्व मंडळी मोठी खबरदारी घेत. पण असल्या खबरदारीच्या कुंपणांतून मामांच्या कानीं ही बातमी उडून जात असे! एखादा माणूस सहज बोलून जाई —

"काय हो मामा, तुमच्या जावयानें तर फार मोठी बहार उडवून दिली. दशरथाचें काम इतकें चांगलें केलें कीं सारीं माणसें टसाटसा रडूं लागलीं!" ह्यावर मामा म्हणत कीं, "हें शक्य नाहीं, ते रात्रीं घरांतच होते."

[आम्ही निजल्यावर मामा दाराला बाहेरून हळूच कुलूप लावून घेत व त्या कुलुपाच्या जोरावरच लोकांच्या तोंडाला कुलूप लावण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

सर्व सामसूम झाल्यावर गंगापुरास चाललेल्या नाटकाची गडबड जलाल-पुरास ऐकूं येई. "आतां गणपती आला, डफावर थाप पडली. हे पाहा 'नाच शारदे' गाणें कसें स्पष्ट ऐकूं येत." असे पडल्या पडल्या विठूरांचे अधीर शब्द अंधारांत उमटायचे, तर इकडे खिडकीजवळ कुजबूज सुरू व्हायची. विठूरांची मित्रमंडळी खिडकीजवळ असून त्यांना खिडकीतून हळूच उतरवून घेत. घर शेतकऱ्याचें असल्यामुळें कासरे दोर वगैरे जेथें तेथें टाकलेले असत; त्यांचा उपयोगहि अर्थात् होतच असे.

नाटक पाहायला तुमचीं तोंडें वडानें नाहीं बंद होणार " मामा खरोखरच त्या रात्रीं गुपचुप नाटक पाहायला गेले आपले श्वशुर गर्दीत दपलेले असतील ह्याची टिळकांना कल्पनाहि नव्हती राम वनवासाला निघाले आहेत आणि दशरथ शोक करीत आहे असा प्रवेश होता टिळक स्वतःच्या कविता रचून त्या गाऊं लागले प्रेक्षक रडूं लागले टिळकाच्या हयातींत काव्यगायनाची प्रथा पडलेली नव्हती पण त्यांनीं आपलें काव्यगायन अशा रीतीनें त्या वेळीं सुद्धां केलें मामाच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व त्यांतच त्यांचा क्रोधाग्नि विझून गेला!

मामांचा क्रोधाग्नि विझला खरा, पण आत्याबाईंची वीज कडकडावयाची होती ती कडाडलीच

टिळक संध्याच करीत नाहींत, संध्येचें भांडें ठेवलें म्हणजे त्यांत पाणी ओतून ठेवतात व भस्म खाऊन टाकतात असा आत्याबाईंनीं टिळकांच्याबद्दल गावांत बोभाटा करावा, तर टिळकांनीं उलट सांगावें कीं सासू फार वाईट, सासरा फार चांगला तो माझ्या अंगावर पांघरूण घालतो व ती पायांकडून काढून घेते!

ह्या धुसफुशीमुळें शेवटीं टिळकांनीं जलालपूर सोडण्याचें ठरविलें मला घेऊन ते नाशकास आले चार दिवस आम्ही नाशकास राहिलों पण चारच दिवसांत नाशिकचा कंटाळा आला पुन्हां परत जलालपुरास जावेंसें वाटूं लागलें

आतां प्रश्न आला चार कोस पायीं मला न्यायचें कसें? मग केलें एक घोडें पण टिळक पायीं व मी घोड्यावर ह्याला मी कबूल होईना! शिवाय मला घोड्यावर बसावयाचें भयहि वाटत होतें ते म्हणाले, "आपण दोघेंहि बसूं घोड्यावर" पण दोघांनीं एकदम घोड्यावर बसायची लाज वाटूं लागली त्यांनीं माझी समजूत काढली, "वानारची वेळ गेली आहे टळून, कोणी भेटणारच नाहीं वाटेनें कोणी भेटलेंच तर सांगूं आपण वरातीं आहों!' माझी समजूत पटली! व आम्ही दोघें घोड्यावर बसून चालूं लागलों आळंदीजवळ गावचा न्हावी भेटला आम्हांला पाहून तो मोठमोठ्यानें हसूं लागला! "अहो जावईबुवा, हीं वरात छान काढलीन!" असें त्यानें हसतां हसतां म्हटलें आम्ही दोघें लाजून खालीं उतरलों न्हाव्याच्या हातावर आठ्यारा आणे पडले कोणाला सांगणार नाहीं असें त्यानें कबूल केलें घोड्यावर आम्हीं टाकलेली गोधडीहि त्याला अर्पण केली कारण ती जलालपुरास न्यायची कशी? घोड्यावर

बसून म्हावीबोवांनीं आपला नाशकाचा प्रवास सुखानें केला व आम्ही गोविंदरावमामांच्या दारीं पायीं पायीं येऊन उभीं राहिलीं.

आमचें स्वागत स्तब्धपणेंच झालें! दोनचार दिवस घरांत मुक्याचें व्रत होतें. मग हळू हळू आत्याबाईचा ज्वालामुखी पेट घेणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं व शेवटीं जें व्हावयाचें तें झालेंच. मामाहि आतां आत्याबाईसारखेंच बोलूं लागले. संसारात टिळकांचें लक्ष नाहीं असें दोघांचें म्हणणें. शेवटीं टिळक रुसले व मला टाकून निघून गेले.

गंगापुरापर्यंत ते अगदीं जोरानें गेले. पुढें गति कमी झाली. वाटेंत भेटले गोपाळभट. हे जलालपुरचे ग्रामजोशी. त्यांच्या अत्याग्रहावरून आपला राग विसरून टिळक जलालपुरला परतले!

ह्या वेळेस माझे वडील बंधु केशवरावमामा ह्यांनीं टिळकांचें स्वागत केलें.

"का? खाल्लांत पुन्हा मुरुड कानोला?"

"छे रे, मी कुठें येत होतों! गोपाळभटानें मला आणलं!"

"अग अग म्हशी मला कां ग नेशी असच झालं म्हणायचं!"

टिळक हसले, त्याचे मेव्हणेहि हसले.

पण ह्यानंतर आम्हांला जलालपुरास फार दिवस राहाणें शक्य नव्हतें. जावयाचें संसारांत लक्ष नाहीं, हें निकत श्राद्ध घेऊन सव्यअपसव्य करीत बसण्याची वेळ आली आहे, वगैरे आत्याबाईंचे शब्द दुसऱ्यांकडून टिळकांच्या कानीं गेले व जलालपुर सोडून नाशकास जाण्याचा पुन्हा विचार ठरला.

विचार अमलात आणावयास टिळकांना फारसा वेळ लागत नसे. लगेच त्यांनीं नाशिकचा रस्ता धरला व ते नाशिक येथें पंचवटींत उतरले. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांनीं तेथें एक खाजगी इंग्रजी शाळा काढली व आमचा संसार अशा रीतीनें सुरळीत सुरू झाला.

— २ —

# सासुरवास

एक दिवस मामंजी सखारामभाऊजींना घेऊन नाशकास उतरले. आमचा संसार पाहून त्यांना समाधान झाल्यासारखें दिसलें. मामंजींचा पूर्वीचा एक सत्यनारायण करावयाचा राहिला होता. सत्यनारायणाची पूजा झाल्यानंतर मामंजी व भाऊजी परत गेले. ते परत गेले न गेले तोंच त्यांचें पत्र आलें, कीं सखारामभाऊजींचें लग्न ठरलें आहे, तरी तुम्ही उभयतां पुण्यास या. वडिलांच्या आज्ञेप्रमाणें आम्ही दोघे पुण्यास गेलों. जातांना त्यांनीं आपली चिमुकली शाळा तिथल्याच एका गृहस्थाच्या हवालीं केली. आपण स्थापन केलेली शाळा मोडतांना टिळकांना फार वाईट वाटलें. पण टिळकांच्या स्वभावांतील हा एक विशेष होता कीं दृष्टीसमोर असेल तें त्यांना जीव कीं प्राण असे; परंतु एखादी व्यक्ति किंवा काम दृष्टीआड झालें कीं मग त्याची त्यांना पुसटसुद्धां आठवणहि राहात नसे. त्यांची 'पांखरा येशिल का परतून' ही कविता पुष्कळांनीं त्यांनाच उद्देशून म्हटली असती तर त्यांत कांहीं वावगें झालें नसतें. ते बाहेर गेले म्हणजे "वाऱ्यावरच्या तरंगा चंचल आहेस तूं भटकून" असें म्हणण्याची आमच्यावर पाळी येत असे. ते असे कोठें गेले म्हणजे मी रडत बसावें, घरांतल्या वृद्ध मंडळींनीं काळजींत पडावें व तरुणांनीं शोध करीत सुटावें. असो.

पुण्याला सर्व वऱ्हाड जमलें, पण कोठें कांहीं माशी शिंकून भाऊजींचें तें लग्न मोडलें. अर्थात् सर्व पांगापांग झाली. दर शुक्रवारीं मामंजींच्या अंगांत देवी येत असे. ह्या देवीच्या मनाप्रमाणें टिळक वागत नसत. शिवाय माझें लग्न झाल्यानंतर दोन महिन्यांतच माझ्या वडीलचन्म वारल्याची बातमी ही देवी अंगांत असतानाच आली त्यामुळें मामंजींनीं त्याच वेळीं माझ्या अंगावरील दागिने उतरून घेतले होते. कुंकूं व मंगळसूत्र तेवढें ठेवलें. नाहीं म्हणायला पैठणी तेवढी मजजवळ राहिली होती टिळकांना तें ठाऊक होतें. त्यांनीं कांहीं निमित्त करून मजजवळून ती पैठणी मागून घेतली. त्या पैठणीचें पुढें काय झालें तें कळलें नाहीं. टिळक मात्र गेले मला पुण्यास ठेवून. त्या पैठणीवर त्यांना प्रवास पुरते पैसे मिळाले

एक दिवस मामंजींनीं माझी जबानी घेण्यास सुरवात केली.

"लक्ष्मीबाई! पैठणी कुठें आहे?"

"मला ठाऊक नाहीं. मीं त्या कोनाड्यांत बांधून ठेवली होती."

"तें मला ठाऊक नाहीं. पैठणी आणून द्या, नाहींतर माझ्याशीं गाठ आहे!" मामंजी घुश्शांत असले म्हणजे मला अहो जाहो म्हणत.

खरी गोष्ट अशी होती कीं भाऊंनीं व मामंजींनीं गहाण पडलेली पैठणी सोडवून आणली होती. पुढें मात्र ती पैठणी माझ्या कधींच नजरेस पडली नाहीं म्हटलें तरी चालेल.

मी पुरतीच सासरीं—म्हणजे सासऱ्याच्या कचाट्यांत—सांपडलें.

"मामंजी, मला बांगड्या भरायच्या."

"मग मला काय सांगतां? पैठणी आणून द्या मग बांगड्या भरू!"

"माझीं लुगडीं फाटलीं—"

"मग मी काय करूं? पैठणी आणून द्या मग लुगडीं घेऊं!"

"तुमच्या गळ्याशपथ पैठणी मीं हरवली नाहीं."

"हें मला कांहीं ठाऊक नाहीं. मोलाचीं दळणीं दळा नि भरा बांगड्या, घ्या लुगडीं—"

वरील तऱ्हेचा संवाद झाल्यावर मी मुसमुसू रडत बसें. शिकेकाई-तेल कांहीं कांहीं मला ते देत नसत. मागायला गेलें कीं वरील ठराविक साच्याचें उत्तर यावयाचें.

एक दिवस दुपारीं मामंजी बाहेरून आले, त्या वेळीं ते माझ्याशीं फार गोड गोड बोलूं लागले,

"लक्ष्मीबाई, तुम्हांला लुगडीं पाहिजेत ना?"

मला फार आनंद झाला.

"होय, माझ्या साड्या अगदीं फाटून गेल्या आहेत."

"एक पाहिजे का दोन?"

"दोन."

"एक पाहिजे असेल तर चार रुपयांचें घेतों. दोन पाहिजे असतील तर दोन दोन रुपयांचीं दोन मिळतील."

झालें! मी काय बोलणार? मला फार वाईट वाटलें. पुन्हा कोपऱ्यांत जाऊन डोळे पुसून कामाला लागलें. हें झाल्यानंतर सासऱ्यांच्या या पहिल्या

साड्या. मला माझ्या माहेरची व गोविंदरावमामांच्या प्रेमाची आठवण येऊन सारखे उमाळे येत होते. थोड्या वेळानें मला दोन दोन रुपयेवाल्या दोन साड्या मिळाल्या.

असे काहीं दिवस गेले. पुढे मामंजींची बदली मुरगाडला झाली होती, तेथें मला घेऊन जाण्याचें दिल्कांनीं ठरविलें. माझे मामंजी म्हणजे अतिशय टापटिपीचे गृहस्थ होते. सासूबाई वारल्यानंतर त्यांनीं दुसरें लग्न केलें नाहीं कीं इतर कांहीं भानगडी केल्या नाहींत. त्यांचें वर्तन फार शुद्ध असे. परस्त्री ते मातेसमान मानीत. सासूबाईंच्या नंतर घरांतील सर्व व्यवस्था ते स्वतः पाहात, स्वतः हातानें स्वयंपाक करीत व तो इतका बेताचा, कीं जेवण झाल्यावर भाताचें एक शीत उरायचें नाहीं!

मुरगाडास ते रामाच्या देवळांत राहात असत. शेजारींच एक खाणावळ होती.

आम्ही मुरगाडास पोचलों तेव्हां मामंजींचें जेवण झालें होतें. ते बाहेर ओसरीवर बसले होते. अर्थात् घरांत आम्हांला कांहीं खावयास मिळालें नाहीं. मामंजींनीं बाहेर खाणावळींत आमची रवानगी केली. भाताच्या वळी, हळद-कुंकवाएवढें वरण, भाजलेले वडवे वाल, शेवटीं ताकाळलेलें पाणी, असा जेवणाचा थाट होता! दिल्कांना त्याचें कांहीं वाटलें नाहीं. पण चार पिढ्या देशांतर काढलेल्या मला मात्र तें जेवण उपासाहून अधिक त्रासदायक वाटलें. जेवण होऊन आम्हीं घरीं आल्यावर मामंजींनीं मला आपलें घर दाखविलें.

"लक्ष्मीबाई, येथें जर तुम्हीं कांहीं अव्यवस्था केली, गबाळेपणा केला तर मला आवडी खपणार नाहीं. हें सर्व साहित्य, हें सरपण, ती बाहेर विहीर. आतां संध्याकाळचा स्वैंपाक तुम्ही करा."

तांदळाच्या भाकरी करण्याचा तो पहिलाच प्रसंग. तांदळाची भाकरी मीं पूर्वी कधीं जन्मांत केली नव्हती कीं पाहिली नव्हती. पहिल्या पावसानंतर जमिनीला जशा भेगा पडतात तशा माझ्या भाकरींना भेगा पडल्या होत्या.

मी स्वैंपाक करण्यास बसलें कीं मामंजी पुढच्या खोलींत बसावयाचे. तेथून त्यांना स्वैंपाकघरांत काय काय चाललें असेल, तें दिसे. पुष्कळ वेळेला एकीकडे त्यांची देवपूजा चाले, तर एकीकडे मला स्वैंपाक शिकविणें चाले. मला स्वैंपाक

चांगला येत होता; पण तो देशावरचा. एकदा मामंजींनीं मला सांगितलें,

" आमटीला जिवंत फोडणी दे ! "

" जिवंत फोडणी कशी द्यायची ? "

" पळी तापवून. "

मी पळी तापवून नेहमीप्रमाणें फोडणी देऊं लागलें. मामंजी संतापले.

" तूं दगड झाली असतीस तर तुझा पायखान्याच्या पायरीला उपयोग झाला असता. "

" कोणास ठाऊक पायखान्याच्या पायरीला उपयोग झाला असता का देवाच्या मूर्तीला उपयोग झाला असता ! " मात्र माझें म्हणणें मनांतल्या मनांत होतें.

मामंजींनीं सांगितलें, " तेलाचा जाळ झाल्यावर फोडणी द्यायची. " मी जाळ करण्यासाठीं जळतें लाकूड उचलून पळीवर धरलें ! अर्थात् पुढें जाळ चांगलाच झाला व त्याबरोबर मामंजीहि चांगलेच कडाडले !

एक तर कोंकणी पदार्थ आमच्या देशावरील पदार्थांहून निराळे; दुसरें त्यांचीं नावें विलक्षण व तिसरें मामंजींचें उपरोधिक बोलणें. त्यामुळें माझी फारच त्रेधा उडे.

एकदा मामंजींनीं मला ' आयती ' करावयाला सांगितलें. मला वाटलें मी आयती बसून खातें, असें म्हणण्याचा तर कांहीं मामंजींचा हेतु नाहीं ? एकदा त्यांनीं सांगितलें, पेजतुळ्या भात कर. मीं पाणतुळ्या हा शब्द ऐकला होता. पण पेजतुळ्या म्हणजे काय हें मला कळेना. शेवटीं मला एक गुरु भेटला. विहिरी-जवळ एक बिन्हाड होतें. तेथें गंगाबाई नांवाची एक माउली होती. मामंजींनीं कांहीं सांगितलें कीं मी कळशी घेऊन पाणी आणायला पळें व पाणी काढतां काढतां खिडकींतून गंगाबाईंना हळूच विचारीं. गंगाकाकूहि मला सारें समजून सांगत. " पेजतुळ्या भात म्हणजे काय हो काकू ? "

" अग, पुष्कळ पाणी भातांत घाल, म्हणजे झाला पेजतुळ्या भात ! "

मी हसत हसत घरीं आलें व मामंजींना पाहिजे होता तसा पेजतुळ्या भात शिजवून त्यांना वाढला. मग त्यांनीं कांहीं तरी विचित्र पदार्थ करायला सांगावें व गंगाकाकूंच्या सांगीप्रमाणें मी सरळपणें—जसें कांहीं मला बाळपणापासून ते ठाऊकच आहेत असें—ते करून टाकावे.

त्यांनीं येथेंहि एक शाळा काढली ते आता ह्या कामांत फार तरबेज झाले होते इंग्रजी शिकविण्यांत तर त्यांचा हातखंडा असे विद्यार्थी म्हणजे त्यांचे दोस्त, बंधु, त्यांची शाळा म्हणजे पगारी शाळा नसे त्यांचं आपल्या विद्यार्थ्यांवर मुलासारखें प्रेम असे व विद्यार्थी त्यांना वडिलासारखा मान देत फीहि चांगली मिळे

माझी स्थिति मात्र चमत्कारिक झाली होती माझ्या हालचालींवर मामंजींचें एकसारखें लक्ष असावयाचें

माझा जन्म जसा काहीं खाण्यासाठींच झालेला ! मला मामंजींच्या बारीकसारीक आचारांची आठवण राहात नसे दुपारचीं जेवणीं झालीं कीं मी उष्टींखरकटीं काढून शेणगोळा भांड्याजवळ ठेवून हात धुई, मग स्वतःचें वाढून घेई एक दोन घास तोंडात पडेपर्यंत मामंजी कधीं काहीं बोलत नसत पण ते पडले कीं त्यांनी म्हणावें,

“ लक्ष्मीबाई शेणगोळा येथें भांड्याजवळ पडला आहे तेवढा दूर फेकून या पाहू ” कीं मीं जेवण दूर सारून शेणगोळा टाकून यावें मामंजींचें नेहमीं सांगणं कीं शेणगोळा भांड्याजवळ टाकू नये पण मी नेमकें तेंच विसरें

पुन्हा जेवायला बसलें कीं त्यांनीं म्हणावं,

“ लक्ष्मीबाई, तुळशीला पाणी घातलें का ? ” कीं मी पुन्हा उठावें हें काम मी रोज विसरें व रोज मला जेवतांना त्याच्यासाठीं उठावें लागे

हा दिवसाचा कार्यक्रम रात्रीचाही कार्यक्रम होताच मामंजींनीं सांगाव,

“ लक्ष्मीबाई, तुम्ही जेवायला बसायच्या आधीं माझा बिछाना घालून ठेवा, टिनपाटांत पाणी ओतून ठेवा विसरू नका बरं ”

रात्रींचीं जेवणीं फार उशीरा होत जेवूनच मग करावं बिछान्याचें काम असें वाटे पण दोन घास तोंडात पडताच मामंजींनीं नेमकें म्हणावें,

“ लक्ष्मीबाई माझा बिछाना घाला पाहू ! ” कीं उठल्याच लक्ष्मीबाई ओवळें नेसावें, बिछाना घालावा व पुन्हा सोवळ्यानें जेवायला बसावें !

एकदा मी स्वैंपाक करायला बसलें असतां काहीं विद्यार्थी आले व म्हणाले,

“ अहो वहिनी ! वहिनी ! दादा तिकडे, नानांचा नि तुमचा बारावा तेरावा घालीत आहेत ना ! ”

मी आपली तडक उठून काय प्रकार आहे तो पाहाण्यास देवळांत गेलें. तों काय ? माडीवरून मामजी एक एक उपकरणें खालीं फेकीत होते. उपकरणें थेट रामाच्या सभामंडपांत येऊन पडे. प्रत्येक फेकीच्या वेळीं त्यांचा मंत्रघोष व्हायचा —

" माझी सून मेली. तिचा आज बारावा आहे. माझा मुलगा मेला. त्याला तिलांजलि देतो. "

झालें होतें काय कीं उपकरण्यांना डाग पडले होते. उपकरणीं होतीं तांब्याचीं, पाणी विहिरीचें, राख लाकडाची न दिवस पावसाचे; ह्यांमुळें मीं तीं कितीहि स्वच्छ घासलीं तरी त्यांच्यावर डाग येत.

मी माडीवर गेलें. तेथेंच शाळेच्या एका कोपऱ्यांत मामजींनीं आपले देव मांडले होते. मी वर जाऊन सारीं उपकरणीं गोळा केलीं. मामंजी माझ्या मागें आले.

" तूं हीं भाडीं घासलीं होतीस ? "

" हो ! "

" वाहा माझी शपथ ! "

" तुमची शपथ मीं घासलीं ! "

" मी मेलों तर तुला काय रडूं येणार आहे ? धर मंगळसूत्र हातात नि वाहा शपथ ! "

मीं मंगळसूत्र हातांत धरून शपथ वाहिली. खरं नाहीं तर मला डर कसली आली ? ,

" थांब ! मी बायकांची सभा बोलावितों व सौंत हीं भाडीं ठेवून त्यांचें मत विचारतों; त्या घालतील घातलें शेण तोंडांत ! "

पण माझी खात्री होती कीं बायकांनीं काहीं माझ्या तोंडात शेण घातलें नसतें.

" धर माझे पाय आणि वाहा शपथ; पाहा, जळून भस्म होशील पायांना हात लावलास तर ! "

मी त्यांच्या पायांवर हात ठेवूं लागलें, तसे ते मागें सरकूं लागले.

" पाहा, विनाकारण जळून जाशील. "

“ कांहीं हरकत नाहीं. तुमच्या पायांजवळ मरण आलें तर कांहीं वाईट नाहीं.”

शेवटीं पालथी पडलें व त्यांचे पाय गच्च धरले. मी कांहीं जळून मेलें नाहीं. मोठी निराशा झाली माझी. एकदाची मरून गेलें असतें तर बरें झालें असतें, असें मलाहि झालें होतें. पण मामंजींची तेवढी तपश्चर्या नव्हती म्हणा किंवा मीं उपकरणीं खरोखरच घामलीं होतीं म्हणा, मी त्या दिवशीं जळालें कांहीं नाहीं !

पण ह्या आगींत टिळकांच्या सहानुभूतीचा ओलावा असल्यानें तेवढेंच दुःखात सुख होतें.

खालील गोष्ट मी कधीं विसरणार नाहीं.

समोरच्या विहिरीचें पाणी आटलें व रानांत विहीर होती तेथें पाण्याला जावें लागे. तेथें दिवसा अतोनात गर्दी होई. मामंजींनीं सांगितलें, रात्रीं जाऊन पाणी आणीत जा. मला अंधाराचें भय वाटे. पण त्यांना त्याचें कधींच कांहीं वाटत नसे. त्यांनीं मला सांगितलें, “ तुला जर कोणीं खायला आलें, तर त्याला सांग माझा सासरा देवळांत बसला आहे. त्याला आधीं खाऊन ये नि मग मला खा.”

पण टिळकांनीं मला सांगितलें, “ भिऊं नको. मी पाणी आणीन.” रात्र झाली म्हणजे खरोखरच त्यांनीं पुढल्या दारून फिरायला म्हणून निघावें व मी मागल्या दारून पाण्याला निघावें. नतर मी घराच्या आसपास थांबावें व त्यांनीं विहिरी-वरून भरून आणलेलें पाणी घरात आणून सांठवावें ! मामंजींना वाटावें कीं सून काय पण विश्वासानें पाणी भरीत आहे !

मामंजी मला वर दिल्याप्रमाणें छळीत ; पण दोन गोष्टींबद्दल मला त्यांचे गुण घ्यावेसे वाटतात. एक म्हणजे मला त्यांनीं कधीं अपशब्द वापरले नाहींत व कधीं मारत्या अंगाला बोट लावलें नाहीं. तसे ते एखाद्या वेळीं माझी इतरांजवळ वाखाणणीहि करीत.

मात्र ती एखादे वेळींच. त्यांच्या जवळ कांहीं मागितलें तर त्यांचा फार संताप होई. तेल नि शिकेकाई मला कधीं मिळाली नाहीं. ती मागायला गेलें कीं त्यांनीं म्हणावें, मोलाचीं दळणीं दळ आणि मग तेल शिकेकाई. मी आपली मातीनें डोकें धुई. त्यांतहि एखादे वेळेस न्हायला बसलें कीं माझ्यापुढचें गरम पाणी त्यांनीं उचलून न्यावें व स्वतः आंघोळीस लागावें ! उरलेलें न्हाणें मीं गार पाण्यानें करावें.

तेल शिकेकाईच्या नेहमींच्या खटक्यांत मला ते एक गोष्ट सांगत,

"एकदा लाकडें संपलीं होतीं. माझी बायको गर्भारशी होती. तरी मीं तिला लाकडें फोडायला लावलीं. मग तुझी काय कथा? माझी बायको उलटून बोलत नसे. घरांतलें सामान संपलें म्हणजे उरलेलें माझ्यासमोर मुकाट्यानें आणून ठेवी व त्यावरून मी समजें सामान संपलें! पण आत्तांच्या तुम्ही पोरी फार उद्धट. वडील माणसांशीं कसें वागावें हें तुम्हाला नाहीं यायचें."

टिळकांची कवि म्हणून आतां प्रसिद्धी होऊं लागली होती. मुंबई-पुण्यापर्यंत त्यांचें नांव ऐकूं येऊं लागलें. मला जरी घरांत त्रास होता तरी त्यांच्या दृष्टीनें आतां हे चांगले दिवस आले होते. त्यांना मुंबईत कोठेंसें व्याख्यान देण्यासाठीं आमंत्रण आलें. आठ दिवसांनीं येतों म्हणून टिळक मुंबईला गेले, ते तिकडेच रमले! आठ दिवस झाले, दहा झाले, पधरा झाले, तरी पत्ता नाहीं कीं पत्र नाहीं!

मला फारच काळजी वाटूं लागली. माझ्या डोळ्याचें पाणी खळेना. त्यांत मामंजींना त्यांनीं सरदारगृहाचा पत्ता दिला होता, त्यानें तर माझी पुरीच पाठ पुरविली. मामंजी म्हणत,

"आज तुझ्या नवऱ्याचें पत्र आलें."

"हं!"

"त्याला सरदारगृहांत धोतरं धुण्याचं काम मिळालं आहे."

"मग मी तीं वाळत टाकीत जाईन."

"तो तेथलीं पानें वाढतो."

"मी उष्टीं काढीन. मला तुम्ही मुंबईला नेऊन पोचवा."

"मजजवळ पैसे नाहींत. तुला पाहिजे तर तूं कशीहि जा, पण मुंबई म्हणजे पुरवाड नाहीं. तेथें एखाद्या खड्यामप्रमाणें तुझा पत्ताहि लागणार नाहीं."

एक दिवस मी फार रडलें. मामंजींना माझी दया आली. ते मजजवळ पाट टाकून बसले.

"लक्ष्मी, मला काहीं फार मुली नाहींत. फक्त एकच आहे. एक मेली तूं माझी दुसरी मुलगीच आहेस. जशी सखू तशी तूं. रडूं नको. जाऊं दे तो गेला तर. उद्या हरताळका आहे. तू सध्याकाळीं दोन बायका आवरणाला बोलीव लाडू वर, मी तुला सर्व कांहीं सामान देतों."

असें म्हणून त्यांनीं बाजारांत जाऊन बेसनाच्या लाडवाचें सर्व सामान आणून दिलें. मीं सर्व तयारी केली. लाडू केले. मामंजींनीं लाडू तयार होतांच तीन लाडू बाहेर काढून ठेवले, डबा उचलून आपल्या पेटींत ठेवला व पेटीला कुलूप लावलें! आलेल्या बायांना तीन लाडवांवर बोळवण घातली!

पाहुण्या बायकांजवळ मामंजींनीं माझी गान्हाणीं करण्यास सुरवात केली,

"लक्ष्मी चोरून खाते!"

गंगाबाई चांगल्याच उसळल्या.

"काय चोरून खाते हो! तुमचा तर सारा माल कुलपांत असतो. काय चोरून खाते ती? लाकडें? नि घासलेट पिते होय?"

अर्थात् हरवाळ्ळ अशी झाली. आपण लाडू कां उचलून ठेवले हें त्यांना सांगावयाचें होतें. पण त्यांनीं वरील प्रस्तावना करतांच बाजू त्यांच्यावरच उलटली.

एक दिवस मामंजी कोठें बाहेर गेले होते. शेजारचीं पाजारचीं मुलें जमलीं व त्यांनीं मामंजींची दौत उपडी केली. मी शेजारीं बसायला गेलें होतें तेथें ती धावत धावत येऊन सांगूं लागलीं, "वहिनी, वहिनी, दादांची दौत उपडी झाली." मी घाबरून उठलें व जाऊन सांडलेली शाई माझ्या पायांनीं पुसून परत आलें. माझीं पावलें जमिनीवर उमटलीं.

मामंजी घरीं येतांच शाई सांडलेली पाहून त्यांचा मोठा संताप झाला. कोणी पोर कबूल होईना. मग त्यांनीं प्रत्येकाचें पाऊल उमटलेल्या पावलावर ठेवून पाहिलें व शेवटीं गर्जतच ते स्वैपाकघरांत आले!

"चल वर!"

मी आज्ञेप्रमाणें वर गेलें.

"ही शाई कोणीं सांडली?"

"मला नाहीं ठाऊक!"

"हें पाऊल कोणाचें? ठेव तेथें पाऊल. सांग शाई सांडलीस कीं नाहीं?"

"मीं नाहीं सांडली."

"तूंच सांडलीस. ही सरकारी शाई होती. तुला ती भरून द्यावी लागेल."

मामंजी दटावीत होते.

"मी कशी भरून देऊं?"

" दळण दळ मोलाचं ! "

हें पालुपद माझ्या चांगलें परिचयाचें झालें असल्याकारणानें त्याचें मला कांहीं वाटेनासें झालें होतें व तसा प्रसंगहि देवानें मजवर कधीं आणला नाहीं.

मामंजींनीं दोन पत्रें लिहिलीं. एक टिळकांना मुंबईस व दुसरें गोविंदराव-मामांना जलालपुरास.

टिळकांना लिहिलें कीं, " तुझी बायको रात्रीची बाहेर जाते व पहाटे घरीं येते. तूं येऊन तिला घेऊन जा. मजवर कांहीं जबाबदारी नाहीं. नाहीं तर आजच तिला तिलांजलि दे. "

गोविंदरावमामांना लिहिलें, " तुमचा जावई फार बिघडला आहे. त्याला नाहीं नाहीं तीं व्यसनें जडलीं आहेत. त्यानें आपली बायको टाकून दिली आहे. तो भांग, गांजा, चरस, चंडोल ओढतो. तुम्हांला तुमच्या मुलीची गरज असेल तर तीन दिवसांत तिला घेऊन जा, नाहीं तर मी तिला कोठेंहि सोडून देईन. "

टिळकांची माझ्याबद्दल पूर्ण खात्री होती व वडिलांचाहि स्वभाव त्यांना चांगला ठाऊक होता. तेव्हां मामंजींच्या पत्राचा टिळकांवर कांहीं परिणाम झाला नाहीं.

मामा आणि आत्याबाई मात्र त्यांना गेलेल्या पत्रामुळे फार घाबरलीं. आत्याबाई म्हणे, " जावई भांग गांजा ओढतो हें ठीक झालें, पण चंडोल कसा ओढतो ? तो हातीं कसा लागतो ? तो तर म्हणे आकाशांत उडतो ! "

त्यावर मामांनीं " चंडोल म्हणजे अफू ओढतो " म्हणून सांगितलें. तेव्हां तर ती फारच घाबरली.

नाना ह्या वेळेस आजारी होते. त्यांचा अगदीं भरंवसा नव्हता. त्यांना तसेंच टाकून मुलीकडे जावें, का त्यांच्याजवळ बसून मुलगी हातची गमवावी अशा पेचांत तीं दोघें पडलीं.

शेवटीं मामांनीं हळूच नानांना विचारलें, " मनीला आणायला जाऊं का ? "

नानांनीं जा म्हणतांच पडत्या फळाची आज्ञा म्हणून मामा सडक मुरबाडला येण्यास निघाले.

टिळकांना गेलेल्या पत्रावर त्यांचा मुळींच विश्वास बसला नाहीं. परंतु त्यांच्या मनानें असें घेतलें कीं दादांच्या बोलण्यानें कंटाळून मीं जीव दिला असावा

व म्हणूनच असें हें पत्र आलें असावें तेव्हां टिळकहि तातडीनें मुरबाडास येण्यास निघाले

मुलगा नाहीं तर त्याही ह्यापैकीं कोणी तरी आता येऊन ही देशावरची, वाईट पायगुणाची, कोकणी स्वपाक येत नसलेली अशिक्षित सून आपल्या जवळून घेऊन जाईल ह्या आनंदात मामनी चूर होऊन गेले होते, तर तिकडे ते दोघे काळजीनें हवालदील होऊन मुरबाडचा प्रवास करीत होते

मुरबाडला मुंबई जवळ असल्यानें टिळकाचा आगगाडीचा प्रवास तायडतोब संपला घरीं मामनी आपल्या मित्रमंडळीसह मोठ्यामोठ्यानें गप्पा मारीत बसले होते टिळकानीं घरीं पोचताच पहिला प्रश्न केला,

" दादा, तुम्हाला कसें वाटतें ? "

" मला काय झाल आहे ? तू आपल्या बायकोला घेऊन जा माझ्याजवळ ती नको ती तुला भलत्याच पढाव्या सांगेल तर तिचें तू ऐकू नको ती कधीं माझ्याशीं बोलत नाहीं " आणखीहि ते बोलतच होते पण पुढें काहीं ऐकण्यास टिळक तेथें थांबलेच नाहींत ते तडक आत स्वैंपाकघरात आले मी तेथें रडत बसलें होत त्यानीं माझी समजूत केली व आपल्याला मुंबईस काम लागलें असून उद्या सकाळीं आपण निघू असें त्यानीं मला सांगितलें माझा आनंद गगनात मावेनासा झाला मामनींनाहि आनंद झाला व दुसऱ्याच दिवशीं आम्ही मुंबईला जाण्यास निघाला

आम्ही मुरबाड सोडलें सकाळीं व त्याच दिवशीं गोविंदरावमामा मुरबाडास पोचले संध्याकाळीं !

मी मुरबाडास नाहीं असें पाहाताच त्याच्या पोटात धस्स झालें मामनी त्याच्याशीं धड बोलेनात तुमची मुलगी तिच्या नवऱ्याबरोबर मुंबईला गेली एवढें मात्र त्यानीं मामाना सांगितलें मुंबईचा आमचा पत्ता विचारला तर मला ठाऊक नाहीं असें त्यानीं उत्तर दिलें

आमच्या मागोमाग मामानीं मुंबईचा रस्ता धरला ते मुंबईस पोचले खरे पण मला शोधायचें कोठें ? अगदीं वेड्यासारखे तीन दिवस ते रस्त्यानें चाळींकडे पाहात पाहात वणवण करीत हिंडत होत

आम्हीं आमचा संसार गिरगावातील गोठ्यांत थाटला घरात सामानसुमान त्यानीं आणून टाकलें व मीं तें लावण्याचें काम हातीं घेतलें पण मुंबईच्या

वलाईनें मला इतकें मारून टाकलें होतें कीं जरा कांहीं 'हे मी' करून ठेवाला किंवा 'अरे माण्या' म्हणून जरीपुराणेवाला ओरडला कीं मी बाहेर ऊन डोकावून जात असें

अशीच एकदा बाहेर डोकें काढून रस्ता न्याहाळीत असतां आ वासून वर ाहात चाललेले मामा मला दिसले! मीं मोठ्यानें हाक मारली, "मामा!"

"मने!" म्हणून खालून आश्चर्यचकित मामांनीं साथ दिली.

आम्हाला दोघांना केवढा आनंद झाला म्हणून सांगूं!

थोड्या वेळानें सासऱ्याजावयांच्या गाठीभेटी झाल्या. मामाना पाहून टिळकाना फार आनंद वाटला मामानीं नाना अत्यवस्थ असल्याचें टिळकाना सागून माझी जलालपुरास जाण्याविषयीं परवानगी विचारली. अर्थात् टिळक नाहीं म्हणणें शक्य नव्हतें. दुसऱ्या दिवशीं पुन्हा मी बोरीबंदरवर दाखल झालें

मामानीं मला बायकांच्या डब्यांत बसविलें व प्रत्येक स्टेशनवर येऊन ते माझी चौकशी करूं लागले. मी त्यांना सर्व ठीक आहे म्हणून सांगत होतें पण खरा प्रकार निराळाच होता.

सिंहस्थाचा तो शेवटला महिना होता. डब्यांत साऱ्या भाट्या–गुजराथ्यांच्या बाया बसल्या होत्या. एकेकीचा देह तुळईसारखा जाड! मला कोणी बसायलाहि जागा देईना. ह्या सगळ्या भाट्यांमध्यें मी एखाद्या लहानशा उंदराप्रमाणें सापडलें होतें. तरी मी उंदराच्या चिरचिरीप्रमाणें त्याना मध्येंच म्हणें, "स्टेशन आलें म्हणजे मी स्टेशनमास्तरला सागेन." पण तेवढ्यानें त्या मोठ्याच दाद देणार! त्यांचें आपलें कोपरखळी मारण्याचें व मधूनमधून चिमटे घेण्याचें काम चालूच होतें. कल्याण सोडल्यावर हळूच एका बाईचें मूल घेऊन मी खेळवूं लागलें. मला थोडीशी बसायला जागा मिळाली. पण हळूहळू डब्यातलीं सारींच मुलें माझ्या अगावर पडलीं! असो. मुलें खेळवीत का होईना, पण सुखरूपपणें चारलें बसून नाशिकपर्यंत पोचता आलें, हें का थोडें झालें!

नाशिकच्या स्टेशनवर उतरल्यावर गावात जाण्यास टांगेवाले पाच रुपये स्वारी मागूं लागले. मामांच्याजवळ तितके पैसे नव्हते. ते म्हणाले, 'तूं टांग्यांत जा.' मी म्हणें 'तुम्ही जा, मी पायीं येतें.' असें करतां करतां दोघांनीही पायीं जाण्याचें ठरलें.

आमच्या लोकांत बोलण्याचा पोच नसतो एवढें मात्र खरें मामा व मी दगदगीनें अतिशय थकलेलो स्टेशनवरून टांग्यांतून सहासात मैल चालत नारायण आलेला पुढें तसें पाहिलें तर नारायण थोडा मुक्काम करून खाऊनपिऊन घरची गाडी घेऊन नंतर जलालपुरचा पुढचा सहा मैलांचा प्रवास आम्हाला उरकायचा पण गांवांत शिरताच उपाध्याय भेटले त्यांनीं खालीं दिल्याप्रमाणें प्रताप केला

"का गोविंदरावमामा, कोठें गेला होता ?"

"मनूला आणायला"

"किती दिवस झाले ?"

"चार"

"मग, नाना गोखले वारले तेव्हा तुम्ही येथें नव्हता वाटतें ?"

हें ऐकल्याबरोबर आम्हा दोघांनाहि अतिशय वाईट वाटलें आता सासरीं नि विसावा कसला ! आम्ही तडक पायींच जलालपुरला जाण्याकरिता निघालों

नानांनीं जरी मला कधीं प्रेमानें कुरवाळलें नव्हतें, तरी मला त्यांच्या मृत्यूनें अतोनात दुःख झालें माझी आई मला माझ्या वयाच्या बाराव्या वर्षींच सोडून गेली ! हें सारें आठवलें !

---

## – ३ –

# संसारांतील ऊन सावल्या

कांहीं दिवसांनीं टिळक मला न्यायला आले. जबलपुराहून आमचा लक्ष्मीनारायणाचा जोडा निघाला. आतां खरोखर नवा व सुंदर संसार स्वतंत्र रीतीनें आम्हांला थाटायचा होता. मी माहेराहून माझ्या नव्या संसारासाठीं घेतां येईल तेवढें सामान घेण्याचा प्रयत्न करीत होतें, तर प्रवासांत सामान घेण्याचा टिळकांचा तिटकारा त्याला आडवा येत होता. तरी मीं भाजीपाला व फळफळा-वळ घेतां येईल तितकी घेतलीच.

जबलपुराहून आम्ही नाशिकला आलों. तेथें टिळकांची अलोट मित्रसंपत्ति होती. त्या संपर्कांत खोळंब्यांत टिळकांनीं दोनदा गाडी चुकविली. आता मात्र तिसऱ्यांदा गाडी चुकूं द्यावयाची नाहीं, असा निश्चय करून आम्ही दुसऱ्या दिवशीं नाशिक गांव सोडून नाशिक रोड स्टेशनवर येऊन पोंचलों. अगदीं प्लॅटफॉर्मवर आलों; आतां माझ्या जिवांत जीव आला. टिळकांनीं हमालाबरोबर सामान देऊन मला प्लॅटफॉर्मवर पाठवून दिलें व ते तिकिटऑफिसपुढील गर्दींत दिसेनासे झाले. मी सारें सामान व्यवस्थित मांडून गाडी येताच आंत चढून शिरण्याच्या तयारीनें उभी राहिलें. गाडी आली. हमालानें सामान आंत टेवलें. मी आत जाऊन बसलें. गाडीनें शिटी फुंकली; मीं भराभर सामान बाहेर फेकून देऊन खाली उडी टाकली; कारण टिळकांचा पत्ता नव्हता! समोरून गाडी पाहातां पाहातां निघून गेली, तेव्हां पलीकडे प्लॅटफॉर्मवर टिळक कोणाशीं वादविवाद करण्यांत गर्क झालेले दिसले! गाडी गेली तरी तिकडे ध्या असे टिळक म्हणाले नाहींत. मी आपली मिटी मिटी पाहात उभी राहिलें.

स्टेशनवरच एक दिवस राहून दुसऱ्या दिवशीं नक्की निघण्याचें ठरलें. सामानसुमानाची नीट मांडामांडी पुन्हा झाली, टिळक आपले येऊनच होते.

एकदाचे आम्ही निघालों. एकदोन स्टेशनें सुखरूपपणें पोंचलो. दरम्यान टिळकांचें लक्ष भाजीपाल्याकडे वळलें. फळफळावळ त्यांनी सारी टप्यातच वाटून टाकली व भाजीपाला खिडकींतून बाहेर एक एक, एक एक, सरळ फेकून दिला! काय सामानाचा भटाट मुला, सुंदरीत जाईनापर्यंतीज चांगली सारें मिळतें, वगैरे

तोंडानें चाललेंच होतें बायकांना माहेरची काडी माडीहून अधिक प्रिय असते पिशव्यातून मीं कांहीं डाळ, तांदूळ वगैरे सामान घेतलें होत त्यानें तेवढें बोरीबंदर स्टेशन पाहिलें

आम्ही नवीन घरीं आलों आईबापाखेरीज बाकी सारें मिळतें हें टिळकांचें म्हणणें खरें करायला सखारामभाऊजी मात्र आमची वाट पाहात असलेले तेथें आढळले सामान गेल्याबद्दल मन खट्टू झालें होतें, तरी घरात डाळीचें पीठ व तांदूळ सापडले तेवढ्यावरच मीं आमची नवीन घरातील पहिली मेजवानी केली

वाढायला घेतलें, इतक्यात टिळक म्हणाले, ‘ सखाराम, मुक्ता नेस मी आता शौचास जाऊन येतो ’ टिळक गेले भाऊजी सोवळ्यात त्यांची वाट पाहात बसले मीं वाढलेला भात पुन्हा पातेलींत भरला आठ वाजले, साडेआठ वाजले, टिळकांचा पत्ता नाहीं ! भाऊजींनीं इकडे तिकडे शोध केला शेवटीं ओवळें नेसून गावात टिळकांच्या जेथें जेथें ओळखी होत्या तेथें तेथें ते जाऊन आले व शेवटीं घरीं येऊन निराशेनें भुकेनें व्याकूळ होऊन भावाची वाट पाहात बसले

आम्ही दोघें गुपचूप बसून राहिलों होतों इतक्यात खालच्या मजल्यावरील जिन्याजवळच्या खोलींतून टिळक कविता म्हणत आहेत असा भास आम्हास झाला सखारामभाऊजी खालीं जाऊन पाहातात तों तिथें काव्यगायनाला पूर आलेला !

सध्याकाळीं सात वाजता वाढलेल्या पानावरुन अशा रीतीनें रात्रीं बाराला मंडळी जेवून उठली

* * *

टिळकांचा वाटेल त्या माणसावर विश्वास बसे अगदीं एखादा अट्टल चोर असला व त्यानें येऊन टिळकांना सांगितलें कीं मी साव आहें कीं ते तावडतोब तेवढ्यावरच तो साव आहे म्हणून विश्वास ठेवीत व जगाशींहि त्याच्यासंबंधीं हुज्जत घालण्यास कमी करीत नसत मनुष्यप्राणी हा जात्या दुष्ट नाहीं परिस्थिति त्याला दुष्ट बनवीत असते असें त्याचें म्हणणें होतें डेक्कन क्वीनचे ब्रेक इतर गाड्याहून विशेष बळकट असावे लागतात कारण तिला वेगहि तसा येतो तद्वत् टिळकांच्या ह्या सद्गुणाला त्यांच्याच सहवासामुळें माझ्या संशयी वृत्तीचा ब्रेक उत्पन्न झाला होता त्यांचा एखाद्या माणसावर विश्वास बसला कीं माझा हटकून त्याच्यावर अविश्वास ठेवलेला ! ह्यावरुन आमचे नेहमीं खटके उडायचे

" माझ्या आईला दया आवडत असे ती कर्मठ नव्हती "

" म्हणून काय झालें, आधीं ब्राह्मण जेवतील, मग तुमचे सारे आंधळे पांगळे बोलवा, मी नाहीं म्हणत नाहीं "

" मला त्या आंधळ्यापांगळ्याला ब्राह्मणाच्याच जागीं बसवावयाचें आहे ब्राह्मणाना बोलवावयाचेंच नाहीं "

शेवटीं हो ना करता करतां मी टिळकांच्या म्हणण्याला कबूल झालें व गुपचूप स्वत च जाऊन एक द्राविडी ब्राह्मण सांगून आलें रेटरेकराची बायको सवाष्ण होती

टिळकांचे आंधळे पांगळे आले माझी ब्राह्मण सवाष्ण आलीं त्यांची पंगत बाहेर बसविली, माझी आत बसली टिळकांनीं आंधळ्या-पांगळ्याना धोतरजोडे दिले, माझे ब्राह्मण कुरकूर करू लागले तुम्ही दुसरे ब्राह्मण का बोलाविले नाहीं व बाहेर हीं माणसें कोण आहेत? मी त्याना सर्व कांहीं समजावून सांगितलें, येथूनच टिळकांचें मन खिस्ती धर्माकडे ओढ घेऊं लागलें खिस्ती धर्माविषयीं ते आपल्या डायरींत म्हणतात ( १८–२–९४ ), " खिस्ती धर्माकडे माझ्या मनाची प्रवृत्ति होत आहे केवळ ईश्वराच्या भाकानें व मायेनें मी बदलों आहे " आणि दुसऱ्या एका ठिकाणीं ते म्हणतात, " जरी बाप्तिस्मा घ्यावयास मला पुष्कळ अडचणी होत्या, तरी आपण खिस्ती आहां असें आताच्या आता जगात प्रसिद्ध करावें असा माझा निश्चय झाला व तदनुसार मीं तें ज्ञानोदयात प्रसिद्ध करविलें व माझा जीव खालीं पडला "

वरील बातमी प्रसिद्ध होताच जिकडे तिकडे मोठी खळबळ उडाली टिळकाना खिस्तीधर्मपराङ्मुख करण्यासाठीं निरनिराळे प्रयत्न करण्यात आले

टिळक खिस्ती होणार म्हणून त्याना गोत्यात आणण्यासाठीं त्यांचे कागदपत्र कित्येक मंडळी पाहाण्यास मागूं लागली! पण मी त्या बाबतींत फार जपू लागलें तें पडलें संस्थान टिळक काय कांहीं आडपडदा न ठेवता वाटेल तें लिहून टाकायचे कोणीं 'घ' चा 'मा' करून त्याना गोत्यात आणलें तर काय करायचें मी त्यांच्या प्रत्येक चिटोऱ्याला जपू लागलें आम्ही एका लहानशा संस्थानात होतों ह्या संस्थानात त्या वेळीं दक्षिणी ब्राह्मणावर डोळा होता असा माझा समज झाला होता, कारण कांहीं ब्राह्मण कांहीं

ना कांहीं कारणांनीं तुरुंगांत पडले होते. तेव्हां त्यांच्या कागदांत राजाविरुद्ध कांहीं अमलें तर काय करायचें. तशांत संस्थानांत विभाऱ्यांवर कांहीं जुलम होत असे, त्या बातर्मीतहि टिळकांनीं बरीच खटपट चालविली होती.

आतां आमच्या येथें पाहुण्यांची गर्दी जमूं लागली. नित्य नवे व पुष्कळ पाहुणे येऊं लागले. टिळकांची त्यांच्याशीं बोलण्याची व वादविवाद करण्याची धांदल असे. हे लोक आहेत तरी कोण व कां येतात असें मीं टिळकांना एक दिवस विचारलें. त्यांनीं सांगितलें, 'हे सगळे माझें मन वळविण्यास येतात.' एकजण म्हणाला, 'पाहा टिळक, मला कोणी नाहीं. माझी इस्टेट बरीच आहे; मी तुम्हांला ती सर्व बक्षीसपत्र करून देतों.' त्यांना तो दत्तक घेण्यासहि तयार झाला. टिळकांनीं त्याला सांगितलें की 'मी ख्रिस्ती होत नाहीं आणि हालोंच तर पैशासाठीं होणार नाहीं.' आप्पासाहेब बुटींनीं बापूसाहेबांना मुद्दाम राजनांदगांवास पाठवून टिळकांना कळविलें कीं मी तुम्हांस शंभर रुपये तुमच्या हयातीपर्यंत देतों, घर देतों व दत्तूची विद्या करतों! पण तुम्ही ख्रिस्ती होऊं नका. टिळकांनीं बापूसाहेबांची समजूत करून त्यांना परत लावून दिलें.

टिळक ख्रिस्ती होणार अशी बातमी नाशकास पेंडशांना कळली, तेव्हां त्यांचें पत्र आलें कीं तुम्ही मजजवळ येऊन राहा. मी तुम्हांला जन्मभर पोशीन व दत्तूची विद्या करीन. तुम्ही माझ्या येथें मांसमच्छर खा, वाटेल तें प्या, मी तुम्हांला मुळींच मना करणार नाहीं; पण तुम्ही ख्रिस्ती होऊ नका.

श्रीमंत आप्पासाहेब बुटींच्या ठिकठिकाणीं पेढ्या होत्या, त्या प्रत्येक ठिकाणीं टिळकांच्या हालचालीवर नजर ठेवण्याविषयीं आप्पासाहेबांचे निरोप गेले. बापूसाहेबांनीं जातांना मला हें सर्व सांगितलें व पैसेहि दिले. जर कांहीं कमजास्त वाटलें, तर आम्हांला तावडतोब तार करा. आम्ही कांहीं तरी करून त्यांना अटकावून ठेवूं, त्यांच्यावर कर्ज दाखवून शेवटीं तुरुंगात ठेवूं त्यांना पण ख्रिस्ती होऊ देणार नाहीं. तुम्ही कांहीं काळजी करू नका.

परंतु ह्या सर्व प्रलोभनांचा किंवा युक्त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. टिळकांनी राजनांदगांवच्या कामाचा राजीनामा दिला. माझी व दत्तूची रवानगी नाशकास आधीच होती. टिळक मुंबईस गेले व तिकडे ता. १०-२-१८९५ रोजीं त्यांचा बाप्तिस्मा झाला.

बाटल्याची बातमी हां हां म्हणतां वणव्याप्रमाणें चहूंकडे पसरली. तिची आंच मला लागूं नये म्हणून माझ्या भावावहिनींनीं व मेव्हण्यानें अतोनात श्रम केले. आणि ऐकतो तों बातमी खरी तरी आहे का हें पाहाण्यासाठीं पेंडशांनीं केशवरावमामांस सुरतेस पाठविलें तेथें पेंडशांचे पुतणे बाळासाहेब होते टिळक वातिरम्यानंतर बगर्देस गेले होते. तेथें केशवरावमामांनीं व बाळासाहेबांनीं त्यांच्या मागोमाग जाऊन त्यांची गांठ घेतली. टिळकांनीं त्यांना विचारलें, "तुम्हीं कां आलां?"

केशवराव म्हणाले, "तुमचा सल्ला घ्यायला आलों." टिळक म्हणाले, "मी ख्रिस्ती झालों आहें. तुम्ही आपल्या बहिणीला संभाळा नाहीतर नि जबलपुरास गंगा आहे. ती जीवदान देईल. तिच्याकडे लक्ष ठेवा."

केशवरावमामा म्हणाले, "जीव दिला, नाहींतर जिवंत राहिली, आतां तुमचा तिचा कांहीं संबंध राहिला नाहीं."

असें म्हणून ते दोघे बसल्येथून जड अंतःकरणानें परत फिरले. निघताना टिळकांच्या शेंडीकडे पाहून तर केशवरावांना हुंदकाच आला रागाचा कितीहि आव आणला तरी आरंभापासून त्यांचे डोळे पाण्यानें भरले होते ते निघताना पूर्णपणें निथळले.

केशवराव माझे बंधु. माझी भाची बाबूताई त्यांना मामा म्हणे, त्यामुळें त्यांना सारींच माणसें मामा म्हणूं लागलीं होतीं व तिच्यामुळें मलाहि सारीं मावशी म्हणत.

केशवरावमामा आले ते एकदम बंगल्यांत भिकूताई अंथरूण धरून पडली होती तिच्याजवळ जाऊन बसले. त्यांनीं तिला सारी घडलेली हकीगत सांगितली. भिकूताईचा कंठ दाटून आला. ती म्हणाली, आव. तूच मनीला काय सांगायचें तें सांग. मला कांहीं सांगवणार नाहीं.

मला वर बोलाविण्यात आलें. धसक्यानें माझी स्थिति इतकी वाईट झाली होती कीं मला जिना चढवत नव्हता! लहान मुलांसारखी मी हात टेकीत टेकीत भावावहिणीपुढें येऊन बसलें.

भावानें मला उपदेश करण्यास सुरुवात केली "सीता, सावित्री, तारा, द्रौपदी, अशा किती तरी पतिव्रता होऊन गेल्या कीं ज्यांची कीर्ति दिगंतीं गाजते आहे..."

मी म्हणालें, "सारें पुराण माहीत आहे. तुम्ही मला उपदेश करण्यासाठीं वर बोलावलें का? तुम्ही मुंबईला गेलां होतां त्यांची खबर काढण्यासाठीं; ते जिवंत आहेत ना, तें मला आधीं सांगा."

"हो! जिवंत आहेत! खुशाल आहेत! आनंदांत आहेत! तेथें त्यांना मास्तरचें काम लागलें आहे. पण...पण..."

"मग पण काय?"

"ते ख्रिस्ती झालेत."

"होऊं द्या झाले तर. कुठेंही असले नि सुखरूप असले म्हणजे झालें. ते गेले तर त्यांनीं काय माझ्या कपाळाचें कागदें थोडेंच फाडून नेलें आहे."

असें म्हणून मी ताडकन उठले व झरझरा जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं आलें. पण खालीं पोचतांच माझ्या अंगांतील सर्व शक्ति नाहींशी झाली. दारांत घरांतील इतर स्त्रिया उत्सुकतेनें उभ्या होत्या त्यांनीं मला धरून खालीं बसविलें. सर्वांना ही बातमी माझ्या आधींच कळली होती. त्या माझी समजूत घालूं लागल्या.

"जाऊं दे गेला तर! देवानें तुला सोन्यासारखा मुलगा दिला आहे! एक डाल नि पृथ्वीचें मोल! तो उद्यां तुझे पांग फेडील! जितकें तूं कष्ट सोसलेस तितकें पुढें सुख भोगशील." पण तो सारा बोध पालथ्या घागरीवर पाण्यासारखा होता. मी एखाद्या दगडासारखी झालें होतें. माझ्या डोळ्यांना अश्रूंचा टिपुस येईना. माझी भयंकर कोरड वळली होती.

रात्रीं आमचे बहुतेक नातलग पेंडशाच्या घरीं निजायला आले होते. जेवलें कोणीच नाहीं. बोलतहि कोणी नव्हतें. ज्यानें त्यानें यावें, दे सापडेल तें अंथरावें व कोठेंही पडावें. कोणीहि कोणाला या, बसा, खा, प्या, वगैरे कांहींच म्हणत नव्हतें. बंगल्यांत बरीच मंडळी निजली होती. मी मध्यें निजलें होतें. माझ्या एका बाजूला केशवरावमामा व दुसऱ्या बाजूला भिकूबाई निजलीं होतीं. दोघांनीं माझ्या अंगावर हात टाकले होते. एक दोनच्या सुमाराला निद्रेनें आपलें जाळें विणण्यास सुरुवात केली. त्यांत माझ्याखेरीज सर्वजण सापडलीं. मीं दोन्ही बाजूंनी दोघांचे हात माझ्या अंगावरून काढून हळूच बाजूला ठेवले. ओचा पदर कसून बांधला, दत्तूला शोधलें पण तो कोठेंच दिसेना. मग मीं आपला मार्ग सुधरला. पुढच्या दाराशीं येऊन मी दाराचा अडसर काढूं लागलें.

इतक्यांत तेथेंच राडंडची अलयेल कानांवर पडली. ती ऐकतांच माझ्या डोक्यांत विचारमालिका सुरू झाली. 'जर मला या लोकांनीं पकडून चौकीवर नेऊन थमविली आणि उद्यां चौकशी सुरू झाली तर ही अमक्या अमक्याची मेहुणी म्हणून बाहेर जग यडनडणार व बिचाऱ्या नानामाहेबांना माझ्यासाठीं खालीं पाहणें लागणार.' सुंदरनारायणाच्या डोहांत जाऊन उडी टाकण्याचा माझा बेत होता. पण तो वरील विचारांनीं यदलला व घरांतील आडाजवळ येऊन मी उभी राहिलें. हा आड फारच अरुंद आहे. पुन्हा विचार आला 'यांत मीं जीव दिला तर मला बाहेर काढणार कसें ? शिवाय उद्यां पंचनाम्याच्या वेळींहि नानासाहेबांना माझ्यासाठीं खालीं पाहण्याचा प्रसंग येणारच !' माझें डोकें भणाणून गेलें. मला कांहीं मार्ग दिसेना. मी आपल्या जागीं हळूच येऊन परत निजलें. थोड्या वेळानें मीं केशवरावमामांचा हात इतका जोरानें दाबला कीं ते खडबडून जागे झाले. त्यांनीं भिकूताईला उठविलें. 'भिकूताई, ही पहा मनी कशी करते आहे.' सारीं माणसें उठून बसलीं. 'काय झालें, काय झालें' म्हणून जें तें विचारूं लागलें मामांनीं माझा हात कसातरी सोडविला. त्यासरशीं माझ्या हातापायांची सर्व शक्ति गेल्यासारखें झालें; मी चांगली शुद्धीत होतें, भोवतालीं काय काय चाललें आहे तें मला कळत होतें पण माझी यत्किंचितहि हालचाल होत नव्हती. जें तें आपापल्यापरी उपाययोजना सुचवित होतें. माझी दांतखीळ बसली. कोणी म्हणत, हिला संतापवायू झाला. कोणी म्हणत, हिनें विष खाल्लें. भिकूताई म्हणाली, 'हिजजवळ एक दिडकीहि नाहीं. ती विष कोठून आणणार ?' तर कोणीं कल्पना काढली कीं हिनें काचा कुटून खाल्ल्या असतील. त्या वेळेस नुकतेच वैरवे निघाले होते. वहिणीनें मला व धाकूमाईला नऊ नऊ केसरें भरले होते. ते तिनें चटकन मोजून पाहिले.

वैद्याला आणलें, नाडीचा त्याला पत्ता लागेना. त्यानेंहि अभिप्राय दिला कीं मीं विष खाल्लें. माझी दांतखीळ उघडून थोडा मोरावळा, कांहीं मात्रा, दूध, वगैरे भरविण्याचा सपाटा सुरू झाला. मला सगळें कळत होतें पण एखाद्या लाकडाच्या ओंड्याप्रमाणें मी झालें होतें. माझी जीभ आंत ओढल्यासारखी होऊन तिजवर कांटे आले होते. ते पुढें महिनाभर गेले नाहींत. भिकूताईचा आजार पळाला. तिनें बिछाना गुंडाळला व ती रात्रंदिवस मजजवळ उभीच्या उभी राहून काढूं लागली. तिला माझें सर्वच करावें लागे. मी नुसती पडून होतें. माझे दात सुद्धा तिला घासावे लागत. वरचेवर मला दूध वारु पाजावें लागे. वऱ्याच

दिवसांनीं माझ्या अंगांत थोडीशी शक्ति आली. मी अंथरुणातल्या अंथरुणांत उठून बसूं लागलें. आतां माझ्या डोळ्यांना पाझर फुटले. एकसारखें मला रडूं येत असे. डोळ्यांचें पाणी म्हणून खळेना; ओघानें काय तें थांबत असेल तेवढेंच. मी कोणाशींच कांहीं बोलत नसें.

एक दिवस मी त्याच वाड्यांत एक खिन्हाड होतें त्यांच्या घरीं जाऊन रडत बसलें. दत्तू आपला बहुतेक वेळ आपल्या मावशीजवळ घालवीत असे. पण त्या वेळीं मला दुसरीकडे बसलेली पाहून तो मजजवळ आला व त्यानें माझा हात धरून मला तेथून उठवून देवघरांत नेऊन बसविलें; तेथें नेऊन बसविल्यानंतर तो मला म्हणाला, " बाई! तूं आपल्या मामामावशीच्या घरांत रड. लोकांच्या घरांत रडूं नको. तुला काय हवें सांग. धारूमाईसारखे पुष्कळ दागिने पाहिजेत का? का मावशीसारख्या सरी बाळी पाहिजेत? का मोठ्या कांठाचीं लुगडीं पाहिजेत? सांग. पण अशी उगीच रडूं नको."

भिकूताई जवळच होती. तिनें दत्तूला ओढून पोटाशीं धरलें व रडत रडत मला म्हटलें, "घे, त्याची तरी अक्कल घे थोडीशी." मला मात्र दत्तूचे हे सुखाचे शब्द ऐकून अधिकच दुःखाचे उम्हाळे आले.

---

## —७—

# माझा आधार

ह्यानंतर पांच वर्षें मीं भावावहिणीकडे काढलीं. टिळक ख्रिस्ती झाले त्या सुमारास पेंड्श्यांची बदली पंढरपुरास झाली होती. सखारामभाऊजीहि पंढरपुरास वकिली करीत होते. तेव्हां साहजिकच मी व दत्तू पंढरपुरास आलों. टिळक तेथें मला भेटायला आले. माझ्या व त्यांच्या भेटी झाल्यास ते मला आपल्याकडे घेऊन जातील अशी पेंड्श्यांना व भिकूताईंना भीति वाटे. पण हळू हळू ती नाहींशी झाली. उलट टिळकांना पुन्हा हिंदु धर्मांत घेण्याचीहि खटपट सुरू झाली. शास्त्रार्थ सापडेनात तेहि पेंड्श्यांच्या विनंतीवरून टिळकांनीं काढून दिले. पैशाचीहि काळजी उरली नव्हती. कारण भिकूताईनें ह्या कामीं आपले सगळे दागिने देण्याचा निश्चय केला व सखारामभाऊजी एक हजार रुपये देण्यास तयार झाले. अडचण होती खुद्द टिळकांच्या संमतीची. ते माझ्यासाठीं पंढरपुरास घुटमळत होते व त्यांना कोणाला दुखवायला नको होतें. पण पुढें एकाएकीं पंढरपुरला कॉलरा सुरू झाला. नानासाहेब राहात होते तेथेंच एक केस होऊन एक तरुण पाव्हणा पाहातां पाहातां मृत्युमुखीं पडला.

टिळकांना ही पळवाट मिळाली. नानासाहेब भोळे. त्यांना टिळक सांगूं लागले, ह्या पोरासारखी माझी गत झाली तर तुम्ही काय करणार? लोक तुम्हांला किती त्रास देतील? त्यापेक्षां मला आतां जाऊं द्या. शंकराचार्यांकडून उत्तर येण्यास अजून अवकाश आहे तोपर्यंत येथला कॉलरा कांहीं कमी होईल आणि मग पाहूं काय करायचें तें.

पेंड्श्यांनीं त्यांना परवानगी दिली, भाडें दिलें व त्यांची मुंबईस रवानगी केली.

भिकूताई व नानासाहेब आतां माझ्याशीं चांगलीं वागूं लागलीं. म्हणजे त्यांचें वागणें तसें कधींच वाईट नव्हतें. पण मध्यंतरीं मी टिळकांबरोबर जातें कीं काय, अशी त्यांना शंका आली होती एवढेंच. भिकूताईनें मला पाटल्या, बिलवर, वगैरे दागिने केले. पण जेव्हां जेव्हां टिळकांच्याकडून कांहीं काळजी उत्पन्न करण्यासारखीं पत्रें येत तेव्हां तेव्हां भिकूताईंना माझा राग येई. त्यांच्या घरीं, दत्तूची व माझी नीटनेटकी व्यवस्था होती.

एक दिवस नानासाहेबांची नगरास बदली झाल्याचा हुकूम आला! आतां सार्‍यांना मोठा विचार पडला. सुद टिळक जरी नगरास नसले, तरी खिस्ती लोक तेथें पुष्कळ! मनूला तेथें कसें न्यायचें! ह्या विचारांत ते आहेत तोंच टिळकांचें पत्र व पायांचीं पाकिटें आलीं. टिळकांनाहि नगरास काम लागलें व ते लौकरच मुंबईहून नगरास जाणार असें त्या पत्रांत होतें! आतां तर मला भिंगारईनोवर जाणें अशक्यच झालें. नानासाहेबांनीं भिकूताईच्या संमतीनें माझ्या भावांना पत्र टाकलें कीं माझी बदली नगरास झाली आहे. तेथें मनूला नेणें इष्ट नाहीं, तेव्हां तिला जलालपुरास पाठवितों. खर्चाची व दोघांच्या काळ्याकाळजीची सर्व व्यवस्था आमच्याकडेच राहील. तुम्हीं एक गोष्ट मात्र करायची. ती म्हणजे तिच्या मनाला व शरीराला जपायचें. हें पत्र हातीं पडतांच माझ्या दोघा भावांनीं आपल्या बायकांना सांगितलें, आज तीन वर्षें आमची बहीण सोयर्‍यांच्या घरीं आहे. तिला आतां आपल्याकडे आणली पाहिजे. आम्ही लोकांचे तमाशे पाहातों तसे लोक आमचे तमाशे पाहातील. तरी तुम्ही तिला एक पाहुणा किंवा आमचा एक आंधळा भाऊ समजून वागणार असाल तर आम्ही तिला आणूं. तिनें जरी आमचें कांहीं नुकसान केलें तरी त्याची जबाबदारी आमच्यावर आहे. तुम्हीं तिच्या मनाला लागेल असें कांहीं करायचें नाहीं. माझ्या दोघी भावजयांनीं म्हटलें कीं तुम्ही त्यांना खुशाल आणा; आम्ही एका शब्दानें त्यांना दुखविणार नाहीं.

जलालपुरास आल्यावर तीन चार दिवसांनीं टिळकांकडून पत्र व पाकिटें आलीं. जलालपुरास मी गेलें हें टिळकांना कळलें कसें कोणास ठाऊक?

जलालपुरास माझ्या भावजयांनीं मला अगदीं काम पडूं दिलें नाहीं. दोघींनीं माझें काम वांटून घेतलें. थोरली दत्तूचें सर्व पाहात असे व धाकटी माझें पाही; मला माझें लुगडेंसुद्धा तिनें धुऊं दिलें नाहीं. मी अलीकडे फार देव देव करूं लागलें होतें. माझें अंगधुण्याचें पाणी काढून देणें, लुगड्याच्या निर्‍या करून ठेवणें, पूजेचें करणें, हें सारें ती करी. मी म्हणें, 'वहिनी, तूं किती रा श्रम घेतेस?' तेव्हां तिनें म्हणावें, 'वन्सं, तुमचं मीं कांहीं केलं तर त्यांत देव मला आशीर्वाद देईल, तसं माईसाहेबांचं केल्यास देणार नाहीं. माईसाहेबांचं केलं तर देव व माणसं म्हणतील ही हें स्वार्थासाठीं करते आहे आणि तुमचं मी निस्वार्थी बुद्धीनें करतें आहे.' ह्याच भावजयीनें दत्तूला बाळपणीं संभाळलें होतें.

जलालपुरास आल्यापासून माझी लोळणफुगडी थांबली होती. मला आतां देवाचा नाद लागला होता. दुसरा कांहींच व्याप माझ्यामागें नव्हता. सकाळीं उठल्यावर वेणीफणी, अंगधुणें करून नियमानें गुरुचरित्र, शिवलीलामृत, देवपूजा, तुळशीची माळ व नंतर जप हा माझा नित्यक्रम असे. मी एक वेळ जेवीं. मला उपासहि बरेच असत. शिवाय चार शुक्रवार, चार शनिवार, चार मंगळवार, ह्या दिवशीं—शुक्रवारीं रात्रीं फक्त दूधभात खायचा, तर शनिवारीं रात्रीं फक्त वडेच खायचे! मंगळवारीं रात्रीं नऊ मुठींचे कानवले करून त्यांतील सहा मुठींचे गायीला घालून तीन मुठींचे मीं खायचे. एकादश्या वगैरे असतच. हें सारें टिळकांनीं प्रायश्चित्त घेऊन परत जातींत यावें म्हणून मी करीं. ज्या दिवशीं उपास असे त्या दिवशीं माझी वडील भावजय आपलें सर्व कामधाम आटोपल्यावर मी पडलेली असेन तेथें एवढे दूधपोहे घेऊन यायची व मला आई बाई करून ती बळें खायला घालायची. एकीकडे तिचा उपदेश चालायचा. ती म्हणे, 'वन्सं, सर्व संपत्तीपेक्षां आधीं शरीरसंपत्ति पाहिजे. ती जर तुम्ही घालवून बसला तर तुम्हाला कोण विचारील? चालतील पाया तर विचारतील आपापा.'

टिळकांनीं परत यावें म्हणून मी नुसते उपासतापास करूनच राहिलें नाहीं. आणखी जें जें सुचेल तें तें मी करीं. पण ह्या दोघीजणी मला फार घोटत असत. त्या म्हणत, ह्या कोणाचें कांहीं वाईट करीत नाहींत, कांहीं नुकसान करीत नाहींत, मग ह्यांना कशाला दुखवा!

जलालपुरास एक भला मोठा मारुती आहे. त्याच्या हातांत मी चिठ्ठी देत असें. हेतु हा कीं त्यानें टिळकांच्या मागें लागून त्यांना परत आणावें. पण हें कोण करतो, हें गावकऱ्यांना कळत नसे. कधीं कधीं मारुतीच्या डोक्यावर दगड ठेवायची. हेतु हा कीं दगड दिला म्हणजे त्याला माझें काम करावेंच लागेल. म्हण आहे ना कीं तुझ्या डोक्यावर कुणीं दगड का दिला होता? म्हणजे अमुक एक गोष्ट करण्याची तुजवर जबरी कोणीं केली होती का? मग मी रामनामाच्या चिठ्या लिहून मारुतीच्या डोक्यापासून पायांपर्यंत चिकटवूं लागलें. हें काम अगदीं पहाटे उठून, अंग धुऊन, कोणी जागें होण्याच्या आधीं करावें लागे. रामाच्या नावाच्या चिठ्ठीचा पायांना स्पर्श होण्याच्या आत मारुती त्यावरचें हें संकट टळण्यासाठीं माझ्यावरचें संकट निवारील अशी कल्पना मनांत होती.

मास्तरीणीच्या हातांत काठी, डोक्यावर दगड, अंगभर चिठ्या हा काय प्रकार आहे ह्याचें गांवभर कुतूहल उत्पन्न झालें. हें चेटूक कोण करतें तें पाहिलें पाहिजे व त्या चेटकिणीला चांगला दोक दिला पाहिजे असें गांवांतील प्रमुख मंडळीनें ठरविलें. एक दिवस ही मंडळी तेथेंच लपून बसली. मी अंग धुऊन ओलेत्यानें तेथें गेलें व एक चिठ्ठी लावून उजनी घेत आहें इतक्यांत दोघे चौघे हातांत काठ्या घेऊन माझ्या अंगावर धावले. थोडें थोडें दिसायला लागलें होतें. जवळ येतांच मंडळीनें मला ओळखलें. दादा कुलकर्णी म्हणाले, 'ताई, तूं असशील अशी आम्हांला कल्पना नव्हती. बरें तर बरें, आता ह्या पोराची आई नाहक प्राणास मुकली असती. आम्हांला वाटलें कोणी चेटकीण हें चेटूक करीत असावी म्हणून आज आम्ही मुद्दाम लपून बसलों होतों. चालूं देत तुझे उपाय. तुला ह्यांत यश मिळून टिळक येथील म्हणजे झालें.'

गंगेपासून घरापर्यंत मी पावलें काढीत असें. तसेंच देवीला रोज तांबडें फूल वाहाण्याचा मीं नियम केला होता. फूल मिळालें नाहीं म्हणजे त्या दिवशीं मी उपास करायची. मला उपास पडूं नये म्हणून माझ्या भावजया मला कोठून तरी तांबडें फूल आणून देत.

माझें एक काम देव देव हें होतें व दुसरें मुलांना शिकवायचें होतें. दत्तूची पहिली मास्तरीण मीच होतें. पुढें दत्तूच्या मुलांचीहि पहिली मास्तरीण मीच झालें! रोज वेळ मिळेल तेव्हां दत्तू व भावांचीं मुलें ह्यांना घेऊन मी त्यांना लिहायला शिकवीत असें.

* * *

भिकूताईनें मला जलालपुरास आणून टाकली होती ह्याचें कारण तिला वाटे मी एखादे वेळेस पटकन् टिळकांकडे निघून जाईन. ती माझ्यावर एक गाणें म्हणत असे. "मैना, तुझा ग पिंजरा मायेचा" वगैरे. गाण्याचा अर्थ असा होता कीं 'मैने, तुला कोंडून ठेवलें आहे तरी हा पिंजरा म्हणजे कैदखाना नाहीं. आम्हांला मायेनेंच तुला कोंडावें लागतें. नाहींतर तूं केव्हांच भुरकन् उडून जाशील.'

माझ्या दोन्ही भावांच्या मुलांना आतां सातवीं वर्षे लागलीं होतीं. दत्तूला सहावें वर्ष लागलें होतें. ह्या तिन्ही मुलांच्या मुंजी कराव्या असा आतां घरांत विचार सुरु झाला. तिन्ही मुलांच्या मुंजी बरोबरच लावावयाच्या ठरलें होतें. पण कित्येक म्हणूं लागले, दत्तूची मुंज आत्तांच करूं नका. जर त्याच्या बापालें

त्याला नेल तर मुनीचा खर्च फुकट जाईल केशवरावमामा म्हणाले, काहीं हरकत नाहीं जानव्याचा दोरा गळ्यांतून काढून टाकायला काहीं खर्च लागत नाहीं त्याचीच मी आधीं मुंज करीन नि मग आमच्या मुलांच्या करीन मामा नाशकास जाऊन ह्या वर्षी मुलाना मुंजी लागतात कीं नाहीं पाहून आले होते विधानादि मुंजी लागत होत्या

दत्तूची मुंज आधीं करायची व मग त्यांच्या मुलांच्या मुंजी करायच्या असें ठरवून त्यांनीं तशा मूळचिठ्ठ्यादि पाठवून दिल्या होत्या टिळकांना पाठविलेल्या मूळचिठ्ठ्यांत मात्र तिथि उलटसुलट घातल्या होत्या हेतु हा कीं दत्तूच्या मुंजीची तिथि तर त्याना कळू नये व मुंज होणार एवढें तर त्याच्या कानावर जाव तिथि मधी कळती आणि त्याच वेळस त्यांनीं मुंजींत काहीं अडथळा आणला असता तर?

दत्तूच्या मुंजींत सव मंडळी तीन दिवस रडतच होती उपाध्यायाच्या मांडीवर त्याची मुंज लागली तोहि बिचारा रडत होता कारण त्याला मुलगा नव्हता तो म्हणे, ज्याला बाप आहे त्या मुलाची ही अवस्था व ज्याना मुलगा नाहीत त्याची ही अवस्था थोडक्यात म्हणजे पहपाहुण्यापासून दत्तूच्या मुंजींत सर्वांनीं एका दिलानें पान्याची पर्जन्यवृष्टिच चालू ठेवली होती

रडतखडत पण कशीतरी निर्विघ्नपणे दत्तूची मुंज पार पडली मुलांच्या मुंजीचें देव देवक बसवायरच्या वेळस टिळकांची मलाहीं छड छड चार पत्रें येऊन पोचलीं दोघा भावाना दोन पडशाना एक व मला एक तीं पत्रें म्हणजे त्याच्या डोक्यात आलें त्या साऱ्याचे चित्रपञ्च होत त्यात काय नव्हतें? शिव्याची लाखोली, सरकारदरबारचा धाक, सार काहीं होतें

मामा म्हणाले, मव्हण्यानें अहेर पाठविला

* * *

पढरपुरास दत्तूची प्रकृति जशी होती तशी ती यथ राहीना त्याला हिवताप लागला व दिवसातून दोन दोन तीन तीन हिंव त्याला यऊ लागलीं त्याच्या मामानीं पुष्कळ उपाय केले पण गुण येईना मी म्हणें 'नागपुर पढरपुर येथें कसें दत्तूला चागल वाटत होतें यथेंच कसें त्याला बरें वाटत नाहीं ज्याच्या जिवावर मला आपलें आयुष्य कढायचें आहे त्यालाच जर बरें नाहीं तर येथें राहून कायचें तरी काय?' पण जायचें कोठें? टिळकांच्या भयाम मला घरची

माणसें कोठेंच जाऊं देणार नाहींत. शेवटीं माझ्या मनानें टिळकांकडे पंढरपुरास जाण्याचें घेतलें पण जायचें कसें ? जवळचे सारे पैसे मामाकडे !

माझा भाऊ माझ्या जाण्याच्या विरुद्ध होता. तो म्हणे, 'ज्यानें मुलींत एका पैनेंहि साह्य केलें नाहीं त्याच्याकडे न बोलावतां तू जावेस हें मला पसंत नाहीं. तू जर आपल्या हट्टानें जात असलीस तर पुन्हा मात्र मला तोंड दाखवू नको.' मी म्हटलें, 'मी हौसेनें जातें आहे असें नाहीं. मला दत्तूसाठीं गेलेंच पाहिजे.' भावजया म्हणू लागल्या, 'दत्तूकरतां जायचें तर जा. पण तुम्ही आम्हाला मुळींच जड नाहीं टिळकांकडे मात्र जाऊ नका ' धाकट्या भावजयीला तर फारच वाईट वाटलें. तिनें अकराव्या दिवसापासून दत्तूला स्वतःच्या अंगावर पाळून सांभाळलें होतें. मी टिळकांना लिहिलें कीं "आज तीन महिन्यांपासून दत्तूला ताप येत आहे त्याला घेऊन पंढरपुरास जावें असें वाटतें. पण जवळ पैसे नाहींत. ते मी गोळा केले असें समजलें तर मावळग मला जाऊं देणार नाहींत तरी ही बातमी बाहेर न फोडता पंढरपुरास जाण्याचें तीन माणसांचें भाडें पाठवा मी भाऊजींकडे जातें."

त्यांनीं तातडतोब पैसे पाठविले व दरमहा दहा रुपये भाऊजींकडे पाठवीन म्हणूनहि लिहिलें.

पैसे येताच मीं तातडतोब पंढरपुरची तयारी केली आत्याबाईला दत्तूची बाळजी लागून राहील म्हणून तिलाहि बरोबर घेतलें अशा रीतीनें आम्हीं जबलपुर सोडलें व पंढरपुरास आलों

म्हटल्याप्रमाणें टिळकांची दहा रुपयांची मनीऑर्डर आली. आमचा पत्रव्यवहार जोरात चालला होता मधून मधून त्यांची पुष्कळ वाकडीं तिकडीहि पत्रें येत. मी देवळात जाऊन तासन्‌तास रडत बसें दिवसातून एकदाच माझें जेवण असल्यानें तें मला साधतहि असे

कधीं कधीं लोक मला टोचून बोलत त्या वेळीं मला फार वाईट वाटे. कोणाकोणाचे बाग्बाण तर आरपार ऊर भेदून बाहेर निघून जात त्यात एखादे वेळीं भाऊजीहि भर घालीत. त्यामुळें माझा जीव अगदीं पिसाळून गेला होता. काय करावें काहींच मार्ग सुचेना

एक दिवस मीं भाऊजींना म्हटलें,

"भाऊजी, तुम्हाला माझी काहीं कींव येते का ? मला आता हें सहन होत नाहीं तुम्ही एक करतां का ?"

"मी काय करूं? तुम्ही सांगा "

"तुम्ही सर्वांना पत्रें पाठवा की मी दत्तूला घेऊन पळून गेलें मला आता कीर्ति अपकीर्तीचें काहीं वाटत नाहीं आता मला सान्याचा कंटाळा आला आहे बहिणीची जी काय चीजवस्त मजजवळ आहे तिची यादी करा ती सारी तुमच्याजवळ ठेवतें तिनें असें म्हणायला नको कीं बाबा गेला नि दशम्या गेल्या "

"तुम्ही जाणार कोठें?"

"मला वाट फुटेल तिकडे जाईन तेथून गेल्यानंतर तुम्हाला पत्र पाठवीन कुठं जायचं तें माझें ठरलेलें नाहीं मी दत्तूकडे पाहून दिवस काढीत आहें त्याची विद्या करून मी आपली कसें तरी पोट भरीन काहीं दिवस तरी सर्वांच्याच जाचातून सुटेन "

भाऊंनींना माझी कल्पना बरी वाटली! आदल्या दिवशीं विठोबाच्या देवळात मला एक बाई भेटली होती मला रडत बसलेली पाहून तिनें जवळ येऊन माझी करुण कहाणी मोठ्या सहानुभूतीनें ऐकून घेतली होती तिचीहि कहाणी करुणच होती ती अगदीं वृद्ध होती तिचे पति तिच्याहून वृद्ध होते त्यांचा एकुलता एक मुलगा नुकताच वारला होता वृद्धापकाळीं त्याचें असें कोणी उरलें नव्हतें तीर्थयात्रा करीत करीत ते पंढरपुरास आले होते दुसऱ्याच दिवशीं गाणगापुरास जाण्याचा त्यांचा बेत होता गाणगापुरास उरलेलें आयुष्य ते घालविणार होते माझी करुण कहाणी ऐकून वाईंच्याहि डोळ्यांना पाणी आलें मी तिला म्हणालें, 'मी तरुण आहें मला काहीं दिवस तरी कोणाचा आश्रय पाहिजे मला तुम्ही आपल्याबरोबर न्या मनकडून अनायासें दत्ताचीहि सेवा घडेल तुम्ही माझी धर्माची आई व्हा मला काहीं दिवस गुप्त राहण्याशिवाय गत्यंतर नाहीं '

ती बाई माझ्या म्हणण्याला कबूल झाली दुसऱ्या दिवशीं माझें भाऊंशीं आरंभीं सांगितलेलें बोलणें झालें नंतर आमचें सर्वानुमतें एक विचारानें जाण्याचें ठरलें व मी बाधाबाधी करण्यास सुरवात केली दुसऱ्या दिवशीं सध्याकाळीं आम्हीं निघणार तों भाऊंनींना तार आली, 'गोसावी फादर कमिंग ' खालीं सही वगैरे काहीं नव्हती सगळे बुचकळ्यात पडले कीं हा गोसाव्याचा बाप कोण येतो आहे पण दुसऱ्या दिवशीं टिळक येऊन उभे राहिले त्यांची तार 'गो सेज फादर, कमिंग' अशी होती म्हणणे

"मला परमेश्वराचा संदेश आहे 'जा' आणि मी येतों." पण तार ऑफिसमध्यें परमेश्वराला किंवा त्याच्या संदेशाला कोण विचारतो? तार पाठविणाराला वाटलें गोसाव्याचा बाप येतो आहे व त्यानें तशी तार भाऊजींच्या हातांत दिली.

* * *

त्याचें असें झालें. टिळक वाईहून पंढरपुरास आले होते. वाईस आदम्माबाई शेख उमर नांवाच्या एक अत्यंत सालस, देवभीरु व प्रेमळ ख्रिस्ती बाई राहात असत. टिळक त्यांना आई म्हणत. टिळक ख्रिस्ती झाल्यानंतर त्यांनीं दुसरें लग्न करावें अशी कित्येक खटपटी लोकांची खटपट सुरु झाली होती. मी त्यांच्याकडे जाण्याची आशा जवळ जवळ पुसटलेली. त्यांना ख्रिस्ती होऊन पांच वर्षे होत आलेलीं. ख्रिस्ती झाल्यानंतर सहाच महिन्यांनीं लिहिलेल्या डायरींत हे शब्द आढळतात. "रात्रीं दारावरून बगी गेली तीं माझें कुटुंब आलें आहे म्हणून मीं खिडकी उघडून पाहावें! शांत एक वाजेपर्यंत जागलों! देवा! ह्या दीन दासावर व त्या दीन दासीवर आणि त्या अज्ञ अर्भकावर दया कर. तुझ्याच गौरवार्थ आम्हांला एकत्र कर— माझा विश्वास आहे. ह्या आठवड्यांत माझ्या प्रार्थनेचें मला उत्तर मिळेल." (२६ ऑगस्ट, १८९५) आदल्या दिवशींच्या डायरींत ते म्हणतात, "देवा, तुझी इच्छा आहे कीं माझ्या कुटुंबानें मजकडे यावें, पण मी अधीर आहे. मला क्षमा कर." ह्यावरून टिळकांची मन स्थिति कशी काय झाली होती हें दिसून येतें. अशा मन स्थितींतच जवळ जवळ त्यांनीं पांच वर्षे काढलीं होतीं. दुसऱ्या लग्नाच्या कटकटीला ते कधीं कधीं चळी पडत, पण तें क्षणमात्रच. एकदा त्यांना अशीच कोणी माळ घातली असतां व सुंदर मुलगी त्यांना दाखविली असतां त्यांनीं **'ताऱ्यांची माला नको मज द्या त्या सुमनाला!'** ह्या शीर्षकाची एक कविता उत्तरादाखल लिहिली. ही कविता मे १८९९ च्या 'सुविचारसमागमां'त प्रसिद्ध झाली असून तिच्या खालीं अशी पादटीप आहे—

"एका एकनिष्ठ पतीस, माझ्या विरहांतरिन पत्नीचा त्याग करून दुसरा संबंध करण्याविषयीं एका गृहस्थानें सूचना केली. ह्या सूचनेला हें त्या विरहव्याकूळ, दीन व प्रेमळ पतीचें उत्तर आहे."

हें पत्र लिहिल्यानंतर आठपंधरा दिवसांनींच वर लिहिल्याप्रमाणें टिळक मला भेटले महाबळेश्वराहून परतताना व महाबळेश्वरास जाताना ते आपल्या या मातेला भेटल्यावाचून व त्यांच्या घरीं चार दिवस राहिल्यावाचून पुढें जात नसत आशम्माबाईंचे पति व मुलेंबाळें सर्व गत झालीं होतीं, परंतु नावाप्रमाण त्या मूर्तिमंत आशा होत्या महाबळेश्वराहून परतलेले टिळक, आशम्माबाईंकडे उतरले होते रोज सकाळसंध्याकाळ दोघे माझ्यासंबंधीं परमेश्वराजवळ प्रार्थना करीत एक दिवस त्यांनीं फारच आग्रहाची प्रार्थना केली कीं देवा, आमच्यासाठीं नको तर तुझ्या गौरवासाठीं हा माय लेकरास तू आण प्रार्थना झाल्यावर आशम्माबाईंनीं टिळकांना दहा रुपये देऊन सांगितलें कीं तुम्ही तार करा व आताच्या आत्ता पंढरपुरास जा लक्ष्मीबाई गाडीनें येणार आहेत दोघांनाहि वाटलें कीं टिळकांनीं नगरला न जाता परस्पर पंढरपुरास जावें, असा परमेश्वरी संदेश आला आहे त्याप्रमाणें टिळक निघाले व मी नागपुरास निघण्याच्या आधींच बारा वाजता पंढरपुरास ते येऊन दाखल झाले

---

## -८-

# मार्गावर

टिळकांना पाहून मला फार आनंद वाटला. गाणगापूरचे माझे बेत जागच्या जागीं विरले. दोन तीन दिवस माझे फार आनंदांत गेले.

सखारामभाऊजी कोणाशीं बोलेनासे झाले. बायको, भाऊ, भावजय, दत्तू इतकेंच नाहीं घर स्वतःची अकरा बारा महिन्यांची मुलगी ह्या सर्वांशीं त्यांनीं जणुं अबोला धरला. आम्हा जावाजावांना ह्याचें कारण कळेना. ते बोलेनात तेव्हां आपोआपच घरांत सगळ्यांनींच मुग्यांचें व्रत धरलें. शेवटीं टिळकांनीं बोलण्यास सुरवात केली. ते म्हणाले, "दत्तूच्या शिक्षणाची मला सोय केली पाहिजे. त्याचें शिकायचें वय आहे. एकदा का शिक्षण मागें पडलें कीं त्याचें जन्माचें नुकसान होईल. तूं मजबरोबर नगरास चल. मी तुला निराळें बिऱ्हाड करून देतो." मी म्हटलें, "नगरास कशाला? येथें द्या मला निराळें बिऱ्हाड करून. मी राहतें येथें."

"तूं असा पैजेचा विडाच उचलला आहेस कीं माझें ऐकायचें नाहीं. आजपर्यंत मीं तुझें ऐकलें. आतां मात्र ऐकणार नाहीं. तुझ्या नादीं लागून मला मुलाचें नुकसान करावयाचें नाहीं. आज साडेपांच वाजेपर्यंत तुला मी वेळ देतों. तेथपर्यंत काय तें ठरीव. मी दत्तूला नेणार. तुम्हीं मला नेऊं दिला नाहीं तर मला दुसरे मार्ग मोकळे आहेत."

त्यांचा सूर बोलतां बोलतां वाढूं लागला. शेवटीं अगदी पंचम झाला.

टिळक फिरायला गेले. मी उठून स्वैंपाकघरांत गेलें. रानांत चहूंकडून एकदम वणवा पेटावा तसें मला वाटूं लागलें. इतक्यांत माझी जाऊ आंत आली. तिनें मला मिठी मारली. मग आम्ही दोघी खूप रडलों.

"बाई, मला सांगा मी तुमच्यासाठीं काय करूं? तुम्ही सांगाल तें करायला मी तयार आहें."

"तूं काय करणार? त्यांचा अर्थ मी मुलाला नेतों नि तूं बैस दुसऱ्यांच्या घरीं कष्ट करीत."

"वाई, असें करण्यापेक्षां तुम्ही त्यांच्याबरोबर जा कशा. तें कांहीं तुम्हांला खिस्ती हो म्हणत नाहींत कांहीं नाहीं. आणि तसाच प्रसंग आला तर इकडे पत्र टाका. मी तुम्हांला पैसे पाठवीन."

आम्हीं दोघींनीं सखारामभाउजींना जावें का म्हणून विचारलें. त्यांनीं कानांवर हात ठेवले. हेंच त्यांचें बोलणें. रखमाईनें मला न्हाऊं घातलें. त्या वेळेस ती एकसारखी रडत होती. एकीकडे ती बोलत होती, "आतां मी मालीच्या डम्यांत कोणाला नमस्कार करूं? माझी वाई आजच मला मेली!" वगैरे.

गाडी आली. गाडींत टिळक, दत्तू व मी वसलों. भाउजी गाडी येतांच बाहेर निघून गेले. रखमाई सोवळें नेसली होती. तशीच मालीला कडेवर घेऊन ती अनवाणी गाडीच्या मागें निघाली. भाउजींना न विचारतांच आम्ही निघालों. टिळक आपल्या भावजयीची एकसारखी समजूत करीत होते व परत जायला सांगत होते. 'माझ्या बाईला सांभाळा, दत्तूला सांभाळा' असें ती एकसारखी बजावून सांगत होती. ते म्हणत होते, 'तुझी ती जाउ आहे, पण माझी बायको आहे. तुला तिच्याबद्दल इतकें वाईट वाटतें तर मला किती वाटत असेल ह्याची कल्पना कर.' मी एकसारखी विठोबाच्या देवळाकडे टक लावून बसलें होतें. मी मनांतल्या मनांत म्हणत होतें, 'देवा, मी आपल्या दोन्ही हातांत दोन मशाली घेऊन ह्या डोहांत उडी टाकीत आहें. तुला हवें तर तार नाहीं तर मार. पण पुन्हा कुणाला शरण जाण्याची वेळ आणूं नको.' मी एकसारखी रडत होतें. टिळक जरी वरून कठोर मुद्रा करण्याचा प्रयत्न करीत होते तरी त्यांचें अंतःकरण स्वभावतः अत्यंत मृदु असल्यानें त्यांना आमची दोघींची स्थिति पाहून गहिंवर येत होता. दत्तूला गाडी बसायला मिळाली म्हणून फार आनंद वाटत होता. येथवेळ तेथपर्यंत रखमाई आमच्या मागें चटचट पाय उचलीत येत होती. पुढें गाडी जोरांत हाकली. रखमाई गाडीकडे पाहात उभीच होती. थोड्याच वेळांत ती दिसेनाशी झाली. मला हुंदक्यांवर हुंदके येऊं लागले. टिळक म्हणाले, "असें काय वेड्यासारखें करतेस? मी तुला कधींच जुलमानें खिस्ती करणार नाहीं. मला तो धर्म आवडला म्हणून मीं तो स्वीकारला. तुला आवडला व तूं खिस्ती झालीस तर मला आनंद वाटेल, पण मी कधीं जुलम करणार नाहीं. त्या

घर आहे. उगीच कां रडतेस ?" टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरच मला अनुभव आला. आज पस्तीस वर्षे तो येत आहे. आमच्या घरांत कधींहि मांस शिजलें नाहीं.

तीन वाजतां आम्ही नगरास पोंचलों. स्टेशन जवळ जवळ येऊं लागलें तसतसें माझ्या व दत्तूच्या पोटांत धसधस होऊं लागलें. गाडी स्टेशनांत येऊन उभी राहाते नाहीं तों आमच्याच डब्यापुढें नानासाहेब पेंडसे ! पेंडशांनीं मला पाहातांच विचारलें, " मने, तूं इकडे कुणीकडे ? "

"दत्तूच्या शिक्षणासाठीं मी येथें आलें आहें. त्याला बरें नव्हतें. मी येथेंच घर घेऊन राहाणार आहें."

" बरें आतां तूं कोठें जाणार ? "

" तुम्ही सांगाल तेथें. "

नानासाहेबांनीं मला व दत्तूला सामानासह आपल्या घरीं पाठवून दिलें. टिळक आपल्या मिव्हाडीं गेले. नानासाहेब पेंडसे कुणालातें पोंचवायला सहज स्टेशनवर आले होते.

पेंडशांच्या घरचा माझा आजचा पाहुणचार कांहीं नवीनच प्रकारचा होता. घरांत गेलें तर कोणी दिसेना. बेसू * लहान, ती तेवढी पुढें आली व मला विचारूं लागली, 'कां मावशी, कां आलीस ?' मी 'उगीच' म्हणून तिची समजूत केली. माझीं कोरीं लुगडीं, चोळ्या, डागदागिने, वगैरे सारें मी बहिणीच्या स्वाधीन करण्यासाठीं बेसूजवळ दिलें. विटाळाचे कपडे धुण्यासाठीं बाजूला काढून ठेवले. ब्राह्मणानें पाणी तापवून दिलें. अंग धुऊन दुसऱ्या दिवसासाठीं एक लुगडें बिऱ्हाडीं नेऊन वाळत घातलें. बिऱ्हाड जवळच होतें. तें बेसूच्या साहाय्यानें शोधून काढलें.

मीं माझा नवा संसार पाहिला. डॉ. ह्यूमसाहेबांना पंढरपुराहून टिळकांनीं लिहिलें होतें व त्यांनीं एका ब्राह्मणाच्या घरात जागा घेऊन हा संसार मांडून ठेवला होता. त्यांत ताट वाट्यांच्या जागीं कप बशा व प्लेटी होत्या व पळ्या ओगराळ्यांच्या जागीं काटे चमचे सुऱ्या होत्या ! मी हे पदार्थ पूर्वी जन्मात कधीं पाहिलेले नव्हते. मी जाण्याच्या आधी घरवाल्यानें टिळकांना सांगितलें होतें, कीं तुम्ही आमच्या घरीं येऊं नका. तुम्हांला यायचें असेल तर तुम्ही आपलें

* डॉ. विष्णुपंत भटांच्या पत्नी.

दुसरें बिऱ्हाड पाहा. पण टिळकांनीं मला हें सांगितलें नव्हतें. मी पेंडशांकडे गेले व ते आपल्या बिऱ्हाडीं गेले. मी आपली मनात माझे रात होतें, कीं आतां काय मी व भिकुबाई शेजारीं शेजारीं राहूं. पेंडशांच्या घरीं गेलें. तेथें जेवणीं होऊन गेलीं होतीं. माझ्याशीं कुणी बोलेना. चुलीवर गुळांऱ्याचें एक मोठें थोरलें पातेलें शिजत होतें. आचाऱ्यानें माझ्यापुढें एक ताट ठेवलें. त्यांत एक चतकोर बाजरीची भाकरी व मीठ! जवळ कोणी उभें सुद्धा राहिलें नाहीं!

सकाळीं टिळक जेवायला येणार; आपल्याला कांहीं तरी केलें पाहिजे म्हणून मीं सकाळींच उठून बिऱ्हाडीं आलें. मिठावरोबर खाल्लेल्या चतकोर भाकरीखेरीज तीन दिवस माझ्या पोटांत अन्न नव्हतें. मीं स्वैपाक केला व टिळकांची वाट पाहात बसलें. डोक्यांत कल्पनांचें काहूर माजलेलें. घरातून दारांत, दारातून खिडकींत, अशा माझ्या एकसारख्या येरझारा चालल्या होत्या. दत्तू पेंडशांकडे, मी इकडे व टिळक तिसऱ्याच कोठें. एका गावात असून संध्याकाळ झाली तरी आमच्या गाठी नाहींत. दिवसभर टिळक आले नाहींत व रात्रींहि आले नाहींत. मी सारा दिवस उपाशी होतें. वहिणीकडेहि दुसऱ्या दिवशीं रात्री अकरापर्यंत मी गेलें नाहीं. रात्रीं अकरा वाजतां पेंडशाचा शिपाई आला व मला त्याच्याकडे घेऊन गेला.

मी पेंडशांच्या घरीं गेलें, घरांत सर्व शांतता होती. नानासाहेब ऑफिसांत बसले होते. शिपायानें त्यांना सांगितलें, ' आल्या. ' त्या सबंध दिवसात एवढा एकच शब्द मला ऐकायला मिळाला होता. पेंडशानीं उत्तर दिलें, ' त्यांना आत घेऊन ये ' मी आत आलें.

" काय ठीक आहे ना मावशी ? मग आतां पुढें काय बेत ? "

" दुसरें शिक्षण. "

" मुलाच त्याची काळजी आहे नि आम्हांला कांहीं नाहीं का ? "

" असें कसें होईल सर्वांनाच त्याची काळजी आहे. "

" हें खरें ना ? मग जबलपुरास जा मी तुझ्या गाडीला पैसे देतों. "

" मला पैसे नकोत. त्याला जबलपुरची हवा सोसत नाहीं त्याच्याकरितां मी आलें आहें; ज्याच्या जिवावर मला आपलें आयुष्य कंठायचें त्यालाच घर नाहीं तर मला काय होय ? "

" फार शहाणी होऊं नको. माझें ऐकून घे. मी तुला रोखी लिहून देतों दरमहा दहा रुपये पाठवीन व पुढें आणखीन् वाढवीन. वीस पुरल्या देतों. "

"तुम्हीं मला कांहीं द्यावें म्हणतां मी आलें नाहीं. दत्तूची प्रिया व प्रकृति ह्या दोन गोष्टी मजपुढें आहेत. तुम्हीं आपली सारी संपत्ति मला दिली तरी ती मला नको. मला तुम्हीं कांहींच कमी केलेलें नाहीं. पण आतां मी मुळींच परत जाणार नाहीं. माझें जें कांहीं होईल तें होवो."

"बरें तर, माझें जें कांहीं तुजजवळ असेल तें परत कर."

"तें मी येतांनाच काढलें होतें व आल्याबरोबर तें येसूच्या स्वाधीन केलें. माणसानें दिलेलें पुरत नाहीं व देवानें दिलेलें सरत नाहीं हें मी पूर्णपणें जाणून आहें."

"तुझा शहाणपणा फारच वाढावत चालला आतां; बरें आतां एक वाजला. नीज तूं. हिला बिछाना द्या रे."

"बिछाना नाहीं. घोड्याचा खोगीर द्या तिला!" आंतून आवाज आला. तो माझ्या वहिणीचा आवाज होता! नायकलीन घोड्याचा खोगीर गड्यानें मजपुढें आणून टाकला.

पहाटे उठून मी बिऱ्हाडीं आलें. दोन दिवस मला टिळकांची किंवा दत्तूची भेट झाली नव्हती. दत्तू मास्तरांकडे सुखरूप होता. त्याची काळजी नव्हती, पण टिळकांचें काय झालें? आशानिराशेचा पिंगा माझ्याभोंवतीं सुरू झाला. तोंच दोन गाड्या व एक बैलगाडी घेऊन टिळक आले.

"काल तुमची किती वाट पाहिली. तुमचा पत्ता नाहीं. दत्तूहि नाहीं. स्वैंपाक सर्व फुकट गेला."

"तुझ्यासाठीं दुसरें घर पाहिलें आहे."

"म्हणजे? मी नाहीं येत."

"तूं येत नसलीस तरी हा घरवाला तुला आपल्या घरांत ठेवीत नाहीं."

"तें कां?"

"त्याची सत्ता. दुसरें घर ब्राह्मणाचेंच आहे. मराठ्याची बाई भांडीं घासायला ठेवली आहे व एक गुजराथी ब्राह्मण पाणी आणायला ठेवला आहे. इतक्या भानगडी काल दिवसभर कराव्या लागल्यामुळें मला येतां आलें नाहीं."

दत्तूला आणला. गाडींत सामान गेलें. आम्ही तिघें टांग्यांत गेलों. अजून वहिणीची भेट झाली नव्हती. दुसरें बिऱ्हाड थाटलें. मीं भातपिठलें केलें व तिघांनीं सपाटून हात मारला. टिळक आपल्या घरीं गेले. तेथून त्यांचें घर शंभर कदमांवर होतें. आतां आपल्याला कसलाच त्रास नाहीं अशा आनंदांत मी व दत्तू सुखानें झोपीं गेलों.

पण सकाळींच घरवालीचा निरोप आला कीं, "तुम्हीं आमच्या पायखान्यांत जायचें नाहीं!" पायखानेहि कमेंठ झालेले! "मग कोठें जायचें बाई?" "सार्वजनिक पायखान्यांत जा." अडली लक्ष्मी मालकिणीचे पाय धरी. सृष्टिनियम कांहीं सोवळेंओवळें पाहात नाहीं.

बाई एकदा भांडीं घासून गेली, दुसऱ्यांदा येऊन सांगून गेली कीं मला भांडीं घासतां येणार नाहींत. मला जातीबाहेर पडावें लागेल. गुजराथ्यांचें तर कोणांनीं पाणीच बंद केलें!

आतां पाणी कोठून आणायचें? हीं तीन अपरिहार्य संकटें आलीं. आतां पुन्हा बिऱ्हाड बदलण्यावांचून दुसरा उपाय राहिला नाहीं.

"आतां आपण फर्ग्युसन गेटच्या कंपाउंडांत जाऊ."

"तें कुठेंसें आहे?"

"येथून जवळच आहे. तेथें ख्रिस्ती लोक राहातात."

"मी त्याच्या शेजारीं येणार नाहीं."

"नाहीं तर कुठें जायचें? आतां तूंच पाहिलेंस ना ब्राह्मणाचें ब्राह्मणत्व? ब्रह्म जानाति ब्राह्मणः! हें ह्यांचें ब्रह्म मी तुला कधींच त्रास देत नाहीं. तुझेच लोक तुला सोडीत आहेत. त्याला मी तरी काय करूं?"

फर्ग्युसन गेटमधील बिऱ्हाडकरूनी त्याऱ्यांनीं माझ्याकरितां सर्व कंपाउंड मोकळें केलें. तेथें एकदर घरें तीन होतीं. तीं सर्व आमच्या ताब्यांत दिलीं. टिळकांना आतां बाहेर कुठें राहायला जायचें कारण उरलें नाहीं व ख्रिस्ती लोकांनीं—मला आवडत नाहीं म्हणून—आमच्या कंपाउंडांत येण्याचें थांबविलें. दत्तू व मी दोन घरांत राहूं लागलों. टिळकांनीं तिसरें घर घेतलें.

हळू हळू टिळकांच्या घरीं ख्रिस्ती लोक येऊं जाऊं लागले. तेथें घरांत रोज प्रार्थना, भजन, शास्त्रवाचन दोन्ही सांज होत असे माझ्या घरांत माझे सारे देव, देवी, गणपति, तुळशी ह्यांचें पूजन सपाट्यानें चाललेलें असे. त्यांच्याकडे चाकर नोकर होते माझ्याकडे कोणी नव्हतें. मराठे मिळेनात व दुसरे चालेनात. मला सगळें हातानें करावें लागे. टिळक जेवायला माझ्या घरीं येत.

त्या वाडींत पाणी नव्हतें मला कमेटीच्या बागेंत जाऊन पाणी आणावें लागे. तेथला नळ मग सार्वजनिक होता. एक दिवस मी तेथें पाणी भरावयाला गेलें असतां दोन बाया नळावर होत्या. त्या परजातीच्या व त्यांतील एकीच्या

अंगावर वरीचसीं पिसें इतस्ततः लागलेलीं दिसत होतीं. मीं म्हटलें, "बाई, जरा दूर हो, मला एवढी घागर भरूं दे." तिनें लागलीच मला उत्तर दिलें, "अग घल ग्ह तिकडे. लय बाह्मनीन अमलीस तर आम्हांला काय? बाह्मनीन झाली तर मंग थाली कशाला ह्या नळावर?"

भिङ्गाईनें मी आल्यापासून अंथरूण धरलें होतें. आम्ही एकत्र आल्यावरोबर प्लेगानें आम्हांला पुन्हा विभक्त केलें. नगरास प्लेगाचा जोर अतिशय वाढला. राहुरीचे मिशनरी रे. बॅलेंटाईन हे एम्. डी. असून त्या वेळेस चांगले नांवाजलेले होते. त्यांना प्लेग ड्यूटीवर नगरास आणण्यांत आलें व टिळकांची त्यांचे जागीं राहुरीस नेमणूक झाली.

आतां मी अगदीं पूर्णपणें ख्रिस्ती लोकांत राहाण्यास आलें. राहुरीस गांवाच्या पश्चिमेस ख्रिस्ती लोकांची वस्ती आहे. ह्या वस्तीच्या पलीकडे अर्ध्या फर्लांगावर डॉ. बॅलेंटाईनसाहेबांचा बंगला आहे. ह्या बंगल्यांत आम्ही सर्व एकत्र राहूं लागलों. फेंगाउंडांत एक निराळी स्वतंत्र खोली होती. ह्या खोलींत मी माझा स्वैंपाक व देव देव करायची. माझें सोंवळेंओवळें नेहमींसारखें कडकडीत होतें.

ह्या खोलीच्या शेजारच्या खोलींत बॅलेंटाईनसाहेबांच्या मुलांची आया राहात असे. हिला सगळेजण आयाबाई म्हणत. आयाबाई अशिक्षित होती. पण दुसऱ्यांच्या सोईगैरसोई पाहाण्याचें वळण हिला इतकें होतें, कीं आतां मला त्याची किंमत कळते आहे. नारायणराव गोखल्यांची मी मुलगी, अगदीं ओवळ्या बाईच्या शेजाराला, तेव्हां साधारणतः खटके उडायला पाहिजेत परंतु तसें कधीं झालें नाहीं. तिनें आपलें पाणें पिणें सुद्धांच सोडलें नाहीं. पण सर्व कांहीं फार युक्तीनें चाले. ती आपल्या खोलींत दोरीवर नेहमीं कांहीं वाळत घाली. तिला विचारलें काय आहे, तर म्हणे, बाई, प्लेगचे दिवस, तेव्हां कपड्यांना हवा पाहिजे ना लागायला. जेवतांना ती दार लावून घेई. त्याचेंहि मला आश्चर्य वाटे. कांहो आयाबाई, तुम्ही दार लावून कां जेवतां? ती म्हणे अहो बाई, आमची रीतच अशी. कधीं कधीं ती जेवायला बसली म्हणजे आंत ठोकल्याचा ठण ठण आवाज येई. मी विचारी आयाबाई तुम्ही जेवतांना ठोकतां हो काय? तेव्हां तिनें उत्तर द्यावं, अहो बाई घुशींचीं बिळें बुजवितें, ह्या घुशींनीं ले त्रास दिला आहे. एकदां तर दार बंद होतें व आयाबाईच्या घरांतून चमत्कारिक कांहीं भाषण ऐकूं येऊं लागलें. कोणी म्हणे मी पाय घेईन, कोणी म्हणे मी मुंडकें घेईन! हें आहे तरी काय? मला मोठी धुकधुक लागून राहिली. मीं म्हटलें

आयाबाई हें काय हो चमत्कारिक तुमच्या घरांतून बोलणें येतें ? तिनें चटकन् उत्तर केलें अहो बाई, काय सांगूं ? राखेसाची गोठ लावली होती, त्यांतलें हें बोलणें.

मला कामाला बाई वगैरे कोणी नव्हतें. आयाबाईनीं हळू हळू सारीं कामें करायला सुरुवात केली. केर काढला तर काय होतें हो बाई ? मला तिनें हळूच विचारावें. तिच्या गोड स्वभावामुळें मीहि तिला तें करूं देऊं लागलें. पाणी स्वैंपाक हीं मात्र माझीं मी करीं.

नगर सोडून राहुरीस येण्याच्या आधींची एक गोष्ट सांगितली पाहिजे. टिळकांकडे एक गृहस्थ आला. त्याला ख्रिस्ती व्हायचें होतें. तो टिळकांना पपा व मला आई म्हणूं लागला. टिळक त्याच्यावर फार प्रेम करीत व त्याला आपल्या मुलाप्रमाणें मानीत. आणि टिळकांनीं कोणावर प्रेम केलें नाहीं ? जो कोणी त्यांना भेटे त्याच्यावर त्यांचा चटकन् विश्वास बसे. माणसाची खरी परीक्षा मला आहे असें त्यांना वाटे. उलट मला वाटे माणसाची खरी परीक्षा मला आहे. हा माणूस मला एक लफंगा वाटे तर टिळकांना तो एक देवदूत वाटे.

बाप्तिस्म्यानंतर तो राहुरीलाहि आला. तेथें त्याचा बाप्तिस्मा झाला. पुढें थोडे दिवसांनीं टिळकांनीं त्याला विसापूरला कमलेचें काम लावून दिलें. त्याला मी पाणी प्यायचें भांडें, कांहीं फराळाचें व अंथरुण पांघरुण देऊन वाटेला लावलें.

एक दिवस टिळक कांहीं कामाकरतां नगरास गेले. ते गेल्यावर दुसऱ्याच दिवशीं त्यांचें पत्र आलें, कीं आपल्या घरची चोरी झाली आहे. नवल वाटलें, कीं घर कोठेंच फोडलेलें नाहीं. कुलुपें जशींच्या तशींच आहेत, दारें सर्व बंद आहेत पण पायथ्यांतल्या टिनपाटापासून एकूण एक सर्व सामान गेलें आहे. पत्र वाचतांच मला टिळकांच्या मानसपुत्राचा संशय आला. हें काम दुसऱ्या तिसऱ्या कोणाचें नसून ह्याच बाप्तिस्म्याचें आहे असें मीं मनाशीं ठरविलें. टिळक लौकरच परत आले. त्यांनीं बऱ्याच प्रोत्साहिक लोणकढ्या थापा मला दिल्यानंतर हळूच म्हटलें शेवटीं चोर सापडला

मीं आतापूर्वीप्रमाणें विचारलें, “सामान सापडलें का ?”

“तूं अशी उतावीळपणा करूं नको. मी सर्व कांहीं तुला सांगतों.”

“बरं सांगा.”

“ मग तो आपला मुलगा दिसायला आहे ना ? तो होता म्हणून सर्व कांहीं मिळालें नाहीं तर एक पुरुष त्यांच्या हातीं लागला नसता.”

“ म्हणजे तो कांहीं पोलीसशिपाईच झाला आहे की काय ? ”

“ नाहीं ग. चोरानें केली चोरी आणि आपल्या लोकांचें भांडें घेऊन गेला. पेठ माधवरांत शिरकला. तेथें ह्यानें ओळखलें. धरला त्याचा हात आणि दिला नेऊन चौकीवर. न कळे किती हुशार माणूस ! ”

“ तुम्ही कांहीं म्हणा, पण चोर चोवटांत सापडे आणि दिनकर नेऊन काय करणार ? हा कोणी तरी माहितींतला भामटा असला पाहिजे. ह्या निम्मा चोराला फार कमावण्या ! ”

“ तुम्ही काय टाकू ! चोर ह्याचेसुद्धा पैसे घेतात.”

“ बर, मग पुढें काय झालें ? ”

“ पुढें काय ? त्याचें पत्र आलें आहे, कीं दहा रुपये पाठवा. सामान माझ्या ताब्यांत घेतलें आहे. पैसे येतांच घेऊन येतों.”

“ मग त्याला का आतां पैसेहि पाठवायचे ? ”

“ तर ! ही कामें का फुकट पैशावांचून होतात ? चल, नाहीं तर मीच जाऊन सामान आणतो. दे पैसे.”

या पैसे आणण्यास आतल्या खोलींत गेले. टिळकांचा हाच विषय चालू होता. आमच्या घरांत नेहमीं बाहेरचीं माणसें बसलेलीं असत आणि घरांतल्या गोष्टी वेगळ्या व बाहेरच्या वेगळ्या असें कधीं नसे. मी आंत आल्यावरचें टिळकांचें बोलणें मला स्पष्ट ऐकूं येत होतें.

“ चोरी त्यानेंच केली. हां, दुसरीकडून पिशव्या आणल्या, चार गाड्या आणून त्यांत सर्व सामान भरलें. लोहारणीनें विचारलें, ‘ सामान कोठें चाललें ? ’ तर तिला सांगितलें, टिळकांनीं मला मुद्दाम राहुरीहून सामान आणण्यास पाठविलें आहे.”

मी हें सगळें ऐकत होतें. पण व्यवहारज्ञानाचा माझ्याजवळ पुष्कळ सांठा असल्यानें मनांत म्हटलें, “ हरकत नाहीं. एवढें मोठें सामान दहा रुपयांत परत मिळतें आहे ना ? जाऊं द्या दहा रुपये गेले तर.” मी बाहेर येऊन टिळकांच्या हातांत दहा रुपये ठेवले.

टिळकांनीं ते दहा रुपये नरसास नेऊन त्याच्या स्वाधीन केले व त्याला सांगितलें मी पुढें जातों. तूं सामान घेऊन ये. टिळक परत आले. मी म्हणालें, 'सामान ?' ते म्हणाले. 'येतें आहे मागून.' मी म्हणालें, "तुम्हीं सारा संसार त्याला दान केला. त्याची दक्षणा राहिली होती ती आतां देऊन आला वाटतं !"

पण टिळकांना तो आपलें सामान घेऊन येणार अशीच पुष्कळ दिवस खात्री वाटत होती. आला नाहीं कधीं तो !

# घोट विषाचा कीं अमृताचा ?

सित्ती झाल्यापासून टिळक उन्हाळ्यांत महाबळेश्वरला जाऊन तेथें युरोपियन व अमेरिकन मिशनरींना मराठी शिकवीत असत. हा शिकवण्याचें त्याना बरेंच उत्पन्न होत असे. ह्या वर्षी त्यांच्यावरोबर मी व दत्तू होतो.

टिळकांनीं बाईस आपल्या आईला – म्हणजे आशम्माबाईंना – आम्ही येतों म्हणून लिहिलें व त्यानाहि आमच्यावरोबर महाबळेश्वरला येण्याचें आमंत्रण दिलें.

टिळकाचे नोकर चाकर, घरवाला वगैरे कधीं बदलत नसत. ते महाबळेश्वरला येऊं लागल्यापासून सैदूमिस्तरीचें घर घेत. ह्याहि वेळेस त्याला त्यानीं आधीं पत्र लिहून ठेवलें होतें. सैदूभाईंनीं सर्व तयारी आगदीं जय्यत करून ठेवली होती. थाड, निढाना, दूध, तूप, दहीं, लोणी, भाजीपाला, सरपण इतकेंच नाहीं तर ह्या दाढीदीक्षितानीं पाणीसुद्धा भरून ठेवलें होतें! स्वैंपाकच काय तो करायचा राहिला होता.

घरवाल्यानें घर उघडून दिलें. सामानसुमान गाड्यांतून काढलें. विहीर घरापासून बाहेर चार हातावर सडकेच्या बाजूलाच होती. पाण्याची सोय पाहून माझ्या सोद्याला पाणी सुटलें. मीं पाणी शेंदलें. गार पाणी, थंड हवा व गोड अन्न. मनहि शांत, तेव्हां आम्ही मोठ्या आनंदानें जेवायला बसलों. टिळक व आशम्माबाई एका पंक्तीला बसलीं. त्याना मीं वाढून दिलें व मग मी आणि दत्तू त्याच्यासमोरच दुसऱ्या पंक्तीला बसलो.

जेवताना मी विहिरीबद्दल माझा आनंद व्यक्त केला. हा विषय निघेपर्यंत आमचें जेवण मोठ्या सुखासमाधानानें चालले होतें. पण पाण्याचा विषय निघताच डोळ्याला पाणी व अन्नात विष अशी स्थिति झाली. टिळक म्हणाले, तूं स्वत पाणी शेंदून आणायचें नाहीं. तें मला शोभत नाहीं. मी ब्राह्मण पाण्याला ठेवतों. माझ्या पोटात धस्स झालें. नगरचा अनुभव अगदीं ताजा होता

सभोवतालीं सारी वस्ती धावड मुसलमानांची होती. आम्ही जातीचे ब्राह्मण। आमचे सोयरे मुसलमान। अशी आमची स्थिति होती. उद्या ब्राह्मण कोठला

मिळायला? आणि टिळकाला तेथें ब्राह्मण वोधींत बसायला वेळ तरी कोठें होता?

तरी मला अजून आधार वाटत होता. मजजवळ अजून दोन घागरी भरलेल्या होत्या. रात्रींचीं जेवणीं झालीं. दीड घागर पाणी उरलें. रात्रीं माझी झोंप पार शोधण्यास गेली ती पहाटे चारला घरीं आली. जागी झाल्यावर पुढें पाण्याची दीड घागर दिसू लागली. सारा दिवस मोठ्या कृपणासारखें वागूनहि संध्याकाळला दत्तूला व मला पुरेल इतकेंच पाणी राहिलें. डोळ्यांचें पाणी पुष्कळ वाहात होतें, पण त्याचा काय उपयोग?

टिळक म्हणत आज तू हें पाणी पी. मी उद्यापासून दुसरी व्यवस्था करतों. मी म्हणे एकदा प्यालें म्हणजे प्यालें, मग काय राहिलें? नेहमींप्रमाणें जेवण्यास बसलें. कंठ दाटून येतच होता. कसें तरी अर्धें जेवण उरकलें. घास घशांत अडकला, टिळक म्हणाले, शरीर रक्षी तो धर्म. शिवाय पाणी चार हात वाहिलें कीं त्याचा विटाळ जातो, असें हिंदुधर्म सांगतो, तू हें पाणी पी.

मी मुसलमानाच्या हातचें पाणी तोंडाजवळ नेलें. हो नाहीं करतां करतां डोळे घट्ट मिटून एक घोट घेतला, तो आंत फार वेळ मुटमळलाच नाहीं. तावडतोब पोटांत होतें नव्हतें तें घेऊन जोरानें बाहेर आला. त्यामुळें जेवणीं तेथेंच आटोपलीं.

मला सडकून ताप भरला. मी अंथरुणावर पडल्या पडल्या उशीला [illegible] होतें. टिळकांना आतां फार चोरट्यासारखें झालें होतें. मी मनांतल्या मनांत टाहो फोडून देवाला म्हणत होतें, "देवा, आज मी हें काय केलें? आज माझे पूर्वज मला स्वर्गांत काय म्हणत असतील? ह्या पापाचें मला कोणतें प्रायश्चित्त भोगावें लागणार आहे?" अशा एक ना दोन हजारों विचारांनीं माझें मन व्यग्र होऊन गेलें होतें.

टिळकांच्या प्रार्थनेला उत्तर आलें. त्या वेळीं माझे डोळे मिटलेले होते परंतु एकदम प्रकाश पडल्यासारखा मला भास झाला. माझी तळमळ नाहींशी झाली व पूर्वी कधीं डोक्यांत आले नव्हते असे विचार आतां माझ्या डोक्यांत थैमान घालूं लागले. माझ्या मनाला जखडून टाकणाऱ्या जातिभेदाच्या सांखळ्या खळखळ तुटून पडाव्या, एका चुटकीसरसें हें झालें. त्या वेळेस माझ्या मनांत आलेले विचार फार स्पष्ट होते. "देवानें जाती केल्या का माणसानें? देवानें केल्या असत्या तर माणसामाणसांत कांहीं तरी फरक ठेवला असता ना? जन्म, मरण, हाड, मांस, बुद्धि, बरें वाईट जाणण्याचें सामर्थ्य, सुखदुःख हीं सर्व, सर्वच

मानवजातीला सारखींच आहेत ना? आणि मनुष्य प्राण्यांत जर देवानें जाती केल्या तर त्याच देवानें प्राणीसृष्टींत कां निरनिराळ्या जाती केल्या नाहींत? ब्राह्मण बैल, शूद्र बैल, वैश्य कावळा, अतिशूद्र कावळा, असले भेद पशुपक्ष्यांत कोठें आहेत? ब्राह्मण व शूद्र ह्यांत कोठें फरक आहे? शूद्राच्या शिरीं नदीचें शिरा नाहीं कीं ब्राह्मणाच्या कपाळीं महादेवाचें लिंग नाहीं. आजपासून मी कोणाला हलकें मानणार नाहीं. ह्यापुढें मला सर्व सारखे आहेत. आजपासून माझ्यांतला जातिभेद समूळ गेला. ह्यापुढें मी सर्वांच्या हातचें खाईन. सर्वांच्या हातचें पिईन. मीं माझे विचार टिळकांना सांगितले. टिळकांची जेव्हां खात्री पटली, कीं मी खरोखरच मनापासून सांगत आहे तेव्हां त्यांना फार आनंद झाला. आदाम्माबाईंनीं स्वैपाक केला व आम्ही सर्व मोठ्या आनंदानें जेवलों. परजातीच्या हातचें अन्न खाण्याचा माझा तो पहिलाच प्रसंग होता. पण पाणी प्यालें तेव्हां माझी जी स्थिति झाली ती अन्नसेवनानें झाली नाहीं. आदाम्माबाई मूळच्या मुसल्मान होत्या

टिळकांचा संसार पुन्हा नव्यानें सुरू झाला. आतां खाण्यापिण्याचा प्रश्नच राहिला नव्हता. मी जरी ख्रिस्ती झालें नव्हतें किंवा ख्रिस्ती होण्याचा माझा बेतहि नव्हता तरी माझ्यांतला जातिभेद सर्व लयाला गेला. त्यामुळें आमचे जे दोन निरनिराळे संसार इतके दिवस होते ते जाऊन दोघांचा एकच संसार झाला. माझ्या मूर्तिपूजेला टिळक थट्टा करीत नसत व त्यांच्या प्रार्थनेच्या वेळीं मी तेथ जाऊन नियमानें बसत असे.

टिळकांची हौस कधीं लाजली नाहीं, कधीं एका बाजूला बसली नाहीं. पैसे असले, कीं लॉंच चहूंकडे ती धागडायला लागे. त्यांनीं लग्नाच्या वेळीं फिरीराची माळ माझ्या गळ्यांत घातली होती व मीं बेफिकीरीची माळ त्याच्या गळ्यांत घातली होती.

महाबळेश्वरांत मिळालेला पैसा महाबळेश्वरांतच खलास करण्याचीं टिळकांच्या वृत्तींत पूर्वचिन्ह दिसूं लागलीं. बायको मुलगा आलेलीं पैसाहि हातांत मुबलक खेळतो आहे. तेव्हां टिळकांनीं खरेदी करण्यास सुरुवात केली. आधीं संसारोपयोगी सामान आलें. कपबशा, चमचे, काटे, सुऱ्या, शुगर पॉट, मिल्क पॉट, बटर पॉट, किटल्या, सूप प्लेटी, डिनर प्लेटी, फ्लॉवर पॉट, तोंड धुण्याच्या गिटया! सर्व थाट नव्या लढ्याचा! तसेंच पुष्कळसें बेताचें सामान त्यांनीं घेतलें. कोणत्या सामानाचा काय उपयोग करावयाचा हेंहि मला ठाऊक नव्हतें व

त्यानींहि त्या गोष्टींचा विचार केला नाहीं नवीन संसार मांडला तो मांडल्या नंतर त्याची दृष्टि कपड्याकडे वळली स्वतःला नवीन चार सूट केले मलाहि दोन गाऊन केले ! मी म्हणे, "अहो, हें काय करता ? दोन लुगडीं का नाहीं आणलीं यापेक्षा ?" ते म्हणाले, "तुला सायकॉलॉजी कळत नाहीं मनुष्यानं काहीं हौसेनें केलें की त्या वेळेस तरी त्याचा हिरमोड करू नये "

प्रत्येकाला बुटाचे तीन जोड करविले माझ्या एकटीच्या बुटाचें बिल चोवीस रुपये झालें ! मीं कधीं साधा जोडाहि जन्मात पायात घातलेला नव्हता

निघेपर्यंत मिळालेला सर्व पैसा खर्च झाला होता आणलेल्या सब सामानाच निघताना सैदूमिस्तरीला दान करण्यात आलें त्याचें घर पुढच्या वर्षासाठीं आयतें 'फर्निश्ड' झालें अर्थात् 'फर्निश्ड' म्हणून पुढच्या खेपेपासून आम्हाला त्या घराचें भाडेहि अधिक द्यावं लागलं असो महाबळेश्वराचे दिवस फार सुखाचे गेले गमतीचे गेले

आम्हीं महाबळेश्वर सोडलें तेव्हा सर्व सामान अगदीं सुटसुटीत व बेताबाताचें होतें दोन ट्रंका, दोन ब्यागी व एक बिछाना जाताना दुसऱ्या सामानालाच एक वेगळी बैलगाडी लागली होती पण येताना एका टांग्यात आम्ही सर्व व आमच्याबरोबर आमचें सामानहि अगदीं व्यवस्थितपणं मावलें ! महाबळेश्वरची हवा मानवली असली तर फक्त शरीराला व मनालाच सामानाला नाहीं, इतकें तें रोडावलें होतें

आम्हीं बोलत, विचार करीत, बेत ठरवीत वाठारजवळ आलों वाठार तीनचार मैल राहिलें तेथें एक पूल आहे खालीं पाणी असून तेथें बैलगाड्या, टांगे सुस्तात जवळच पिंपुरडें म्हणून खेडें आहे

आम्हीं तेथ उतरून फराळाचें सोडलें पोटभर फराळ केल्यानंतर मिळून दत्तूला घेऊन इकडे तिकडे फिरू लागले माझ्या मनात नगरचे पुढचे बेत येत जात होते

माझ्यापुढें अन्नाच्या दोन तीन टोपल्या पाहून हळू हळू भिकारी जमू लागले मीहि धोरणी नगद माल बाजूला काढून ठेवून बाकीच्या अन्नाचा मीं दानधर्म सुरू केला त्या भिकाऱ्यात काहीं मुली होत्या एकीला मी विचारलें का ग, तू भीक कां मागतेस ? ती म्हणाली

"बाई, मला कोणी नाहीं "

" चल येतेस या माझ्याबरोबर ? "

आमंत्रण मिळतांच ती तयार झाली. जेवढी भीक जमली होती तेवढी सोबतिणीला देऊन टाकून व तिच्या कानांत कांहीं सांगून ती मजजवळ येऊन बसली.

" तूं रडणार नाहींस ना ? "

" नाहीं. "

" तर अंग धू, तुझें धोतर दे टाकून नि हें लुगडें नेस. ही चोळी घे. "

तिनें माझ्या सांगण्याप्रमाणें केल्यावर तिच्यात कितीतरी फरक दिसूं लागला. मुलगी काळीसावळी पण नाकीडोळीं नीटस असल्यानें ही पांच मिनिटापूर्वी येथेंच भीक मागत असेल असें कोणीं म्हटलें नसतें. तिचें वय बारा तेरा वर्षांचें असेल.

" तुझें नाव काय ग ? "

" माझें नांव नकोशी. "

" तूं मला हवीशी आहेस. तुला मी हौशी म्हणत जाईन. " हा नामकरण-विधि होईपर्यंत टिळक डबुला घेऊन परत आले. आम्ही दोघी मायलेकी बोलत बसलो होतों. त्या वापलेकांना वाटलें ही कोणी वाटसरू असेल. पण माझेंच लुगडें तिच्या अंगावर पाहून व बोलण्याच्या धोरणावरून टिळकांनीं विचारलें, " ही कोण ? " मीं त्यांना " ही मुलगी आहे " म्हणून सांगितलें.

" तें समजलें, पण ही मुलगी कोणाची ? "

" आपली. "

" आपली ? आपली म्हणजे ? हा काय गोंधळ आहे ? "

" हिला कोणी नाहीं. दुष्काळानें हिची फार वाईट स्थिति झाली आहे. अशीच भीक मागत ही कोणाच्या तरी वळचणीला पडते. तिची इच्छा आपल्याबरोबर येण्याची आहे. मीं तिला घेतली. "

" बरं काहीं रक्त नाहीं. "

अशा कामाला टिळक कधींच नाहीं म्हणाले नसते अशी माझी खात्री होती. इतर वेळेस नसलें तरी असल्या परोपकाराच्या कामात आमचें दोघांचें नेहमीं एकमत होत असे.

विचारलं त्याना माझ्या तोंडून सर्व हकीकत ऐकून मोठा आनंद वाटला दुसऱ्या दिवशीं मी, दत्तू व हौशी ह्याचा वाढदिवस राहुरीच्या दवाखान्यात (चवमध्यें) झाला

त्याच वर्षाची आणखी एक संस्मरणीय गोष्ट म्हणजे माझं भाषण अहमदनगरास दर दिवाळींत ऐक्यसभा म्हणून एक मोठी सभा भरत असे ह्या सभेला नगर, सातारा, सोलापूर वगैरे जिल्ह्यांतून खिस्ती लोक जमत व तिला एक प्रकारचें यात्रेचें स्वरूप येत असे खुद्द नगरचे दीड एक हजार स्त्रीपुरुष व बाहेरचे चार पाचशें असा दोन हजार समाज सहज जमे नगरचें जुनें देऊळ अगदीं गच्च भरून जायचें

त्या दिवशीं तर अगदीं दाराखिडक्यांतूनहि लोक होते टिळकाची बायको बोलणार म्हणून ज्याला त्याला कुतूहल वाटत होतें टिळकाना फार हौस कीं आपल्या बायकोनें कोणी तरी मोठें व्हावें लेखिका, कवयित्री, वक्ती तिनें बनावं व ह्या दिशेनें ते नेहमीं प्रयत्न करीत आधीं आधीं त्याना त्यापैकीं पहिल्या दोन बाबतींत अगदींच निराश व्हावें लागलं, पण मग त्याना माझ्याबद्दल फार आशा वाटू लागली असो वक्ती बनण्याचा माझ्यावर हा पहिलाच प्रसंग ज्या बाईनें दिवा लावला नाहीं ती आता पाहाण्यास जाणार ! ह्यापूर्वी भाषण करणें तर बाजूलाच राहिलें पण मी तें ऐकलेंहि नव्हतें एक राजनादगावच्या वक्तृत्व समारंभ झालेला मला माहीत पण त्यात माझकडे काम होतें स्वैपाकिणीचें व वाढपिणीचें !

मला टिळकानीं भाषण लिहून दिलें होतें व तें पाठहि करून घेतलं होतें किती तरी वेळा त्याची सभा दिली रानात दोघानींच जाऊन मी त्याच्यापुढें तें मोठ्या स्वरात पाठ म्हणून दाखविलं होतें अशा रीतीनं तयारी तर अगदीं अवाढव्य झाली होती प्रत्येक वक्त्याला दहा मिनिटें देण्यात आलीं होतीं माझ्या आधीं दोन चार भाषणें झालीं होतीं माझं नाव निघताच मीहि पुलपिटवर मोठ्या ऐटीनें जाऊन उभी राहिलें पुढें लोकाचा अपार समुदाय पसरला होता अगदीं पुढं पहिल्याच बाकावर डॉ ह्यूम बसले होते माझा पोषाख होता तोच होता म्हणजे नथ, बुगड्या, कुंकू, कासोट्याचं लुगडें असा थाट होता

प्रार्थना करीत होते कीं, "देवा, हिच्या तोंडून चार शब्द तरी निघूं देत!" कोणीं पाण्याचा पेला आणून ठेवला, कोणीं लवंगा आणून ठेवल्या. पण मला शुद्धी फोरडच पडली नव्हती तर मी त्यांचा उपयोग तो कसा काय करणार! कोणी मनांत म्हणत हिच्या हातांत कागद आहेत ते हिला वाचण्याची तरी बुद्धि होवो. दुसऱ्या हातांत रुमाल होता. पण तोहि तोंडाकडे जाईना. रुमालाची संवय नाहीं व कागद वाचण्याची आठवण नाहीं! माझ्या मागून आणखी बरींच भाषणें व्हायचीं होतीं. तेव्हां डॉ. ह्यूम माझे आभार मानण्यासाठीं उठले. इतक्यांत मला वाचा फुटली व मी इतकी घडघड व अस्खलित बोलूं लागलें कीं माझें भाषण ऐकून सर्व लोक चकित झाले. भाषण संपलें. पण माझें मन म्हणे कांहीं तरी चुकून राहिलें. कागदावर डाग पडला होता तेपलें भाषण राहिल्यासारखें वाटलें. शेवटीं पाठ केल्याच्या बाहेरचें मी बोललें! सांठें प्रसंगावधान राखलें! मी म्हणालें, "मला जें सांगायचें तें मीं सांगून टाकलें. आतां ह्यांतील जें कांहीं सांगायचें राहिलें असेल तें आपले प्रिय मिस्टर टिळक सांगतील!" मी जागेवर येऊन बसलें. माझ्या जागीं पुलपिटवर टिळक दिसूं लागले. ते म्हणाले, "मला सांगायचें हिनें कांहींच ठेवलें नाहीं." घरीं आल्यावर मी त्यांच्यावर फार रागावलें. मीं त्यांना सांगितलें इतःपर मी कोठें बोलावें असें तुम्हांला वाटत असेल तर मी पाठ करून बोलणार नाहीं. मला माझ्या मनाला वाटेल तसें बोलेन.

मला सभाधीट जर कोणीं केलें असेल तर तें ख्रिस्ती श्रोत्यांनीं. त्या दिवशीं माझ्या पहिल्या भाषणांत नऊ मिनिटें हा एवढा मोठा समाज जो इतका शांतपणें थांबला त्यानेंच माझी भीड चेपली. ह्या समाजांतील श्रोत्यांची सभेंतील वागण्याची शिस्त कमालीची सहानुभूतीची व शान्ततेची असते.

ख्रिस्ती झाल्यानंतर निष्टुना ख्रिस्ती होण्याचे वेध लागतांच महाराची मुलगी मीं माझ्या घरांत आदीं स्वतःची मुलगी म्हणून घेतली. ह्यानंतर नगराम आल्यानंतर टिळकांनीं भिक्या नावाचा एक महाराचा मुलगा घेतला. नंतर एक मांगाची मुलगी घेतली. मला तिची दया आली म्हणून तिचें नाव दया ठेवलें.

आईच्या मागें माझी बहीण मला माझ्या आईच्याच जागीं होती. पण ही स्वभावानें जितकी प्रेमळ तितकीच अभिमानी होती. गांवोगांवच्या गांवांत ती असून तिची माझी गांठ नव्हती. दगडूच्या मुंबईंत तिला पाहिली तेव्हांच, "तिला

आम्ही पिंपळगावाहून निघालों. सामानसुमान टांग्यात ठेवलें. आम्ही टांग्यात बसलों. पण मुलगी टांग्यात बसायला तयार होईना. ती तशीच टांग्याच्या मागें पळूं लागली! आम्हांला फार वाईट वाटलें. टांगा हळू हळू चालविला. जोडा खालीं टाकला. तो ती पायात घालीना. शेवटीं अनवाणी तीन मैल टांग्यामागें पळत पळत ती आमच्याबरोबर स्टेशनपर्यंत आली. आम्ही स्टेशनात पाय टाकताच गाडी सुटल्याची घंटा झाली. टिळकांनीं घाईघाईनें सर्वांचीं तिकिटें काढलीं.

गाडी चालली तशी माझी विचारमालिकाहि वाढत होती. ही मुलगी घेतली खरी. पण ही कशी वागेल, सरकटें अंगाला लावील का घरात कोठें पिंकी टाकील, का थुंकेल—एक ना दोन हजारों विचारांनीं मन व्यग्र झालें. वाटेंत दोन दिवस टिळक पुण्यास राहिले व मी मुलांना घेऊन पुढें नगरास आलें. परत आल्यावर त्याच्या नेहमींच्या कापडाच्या दुकानदारानें त्यांच्यापुढें कापडाच्या बाकीचा हिशेब ठेवला व हळूच पैशाची गोष्ट काढली. टिळकांनीं पैसे पाठवून देतों म्हणून सांगितलें. घरीं येऊन हौदीकरिता मीं कांहीं उधार आणलें का म्हणून विचारलें. मीं कांहींच आणलें नव्हतें, तेव्हा नोकराचा संशय आला. आम्ही आल्यापासून तो आलाच नव्हता. टिळक त्याच्या घरीं गेले. त्याला पश्चात्ताप झाला, तो रडला. टिळकांची त्यानें क्षमा मागितली. झालें. टिळकांनीं घरीं येऊन माझी समजूत केली, "मीं त्याला खूप धाक घातला आहे मीं जर पुन्हा असें केलेंस तर तुरुंगातच घालीन! पुन्हा माझ्या कानावर असें कांहीं आलें तर याद राख, माझ्याशीं गाठ आहे."

"पण मी सांगत होतें ना ह्या लोकांवर इतका विश्वास टाकूं नये म्हणून! त्याला पोलीसच्या स्वाधीन का नाहीं केला?"

"गरिबीमुळें त्याला मोह पडणें साहजिक आहे. शिवाय त्याला आता मीं चांगली धमकी दिली आहे. पोलीसच्या हवालीं करून आपला कोणता फायदा आहे? उगीच खर्च आणि वेळेचा व्यय. नाहींतरी आपले पैसे कुठें खर्च होत नाहींत? त्या बिचाऱ्याला कुठें उगीच गुंतवून टाकायचें. शिवाय तें सारें विकून तो खाऊनहि बसला आहे. मीं त्याला चांगली धमकी दिली आहे."

मीं त्याला धमकी दिली आहे हें पालुपद चालूच होतें. पण हें उगीच दाखविण्यापुरतें होतें. खरी गोष्ट म्हणजे तो रडला आणि हे विरघळले.

महाबळेश्वराहून आम्ही परत आल्यावर एक दोन महिन्यांनीं डॉ. वालंटाइन-साहेबांच्या आमंत्रणावरून चार दिवस राहुरीस गेलों होतों. राहुरीस आम्हांला एक लहानसं घर चार दिवसांसाठीं दिलें होतें. जेवण डॉ. वालंटाइनसाहेबांकडून वाढून येत असे.

रोज सकाळ-संध्याकाळ आमच्या घरीं शास्त्रवाचन, पोथीप्रार्थना, भजन हीं होत. भजनांत टिळक आपलीं प्रेमळ पद्यें तयार करून म्हणत. प्रार्थनेला नेहमींच शेजारपाजारची मंडळी जमत. जमलेली मंडळी आपल्याला आवडत असेल तें शास्त्रवाचन म्हणजे 'बायबल वचन' म्हणे. राहुरीला आल्यावरहि हा नियम चुकला नाहीं. मी व दत्तु हिंदु होतों तरी आम्ही नियमानें टिळकांच्या प्रार्थनेला बसत होतों. मला प्रार्थना आवडूं लागली. आपण आपल्या हृदयस्थ परमेश्वराशीं बोलणें म्हणजे एक नवा आल्हादजनक अनुभव मला वाटूं लागला. बायबलचीहि ऐकून ऐकून मला पुष्कळ माहिती झाली.

दिवस शनवारचा होता. अशीच प्रार्थनेला मंडळी जमली होती. जमलेल्या सर्व ख्रिस्ती लोकांनीं शास्त्रवचनें म्हटलीं. दत्तूवर पाळी आली. त्यानें 'देव प्रीति आहे' हें शास्त्रवचन म्हटलें. मजवर पाळी आली तेव्हां मीं 'हे देवा, मज पाप्यावर दया कर' हें शास्त्रवचन म्हणालें.

टिळक म्हणाले,

"तुझ्यावर देव कधींच दया करणार नाहीं."

"कां नाहीं करणार?"

"तुझी जर ख्रिस्ताच्या ठायीं भक्ति असेल आणि ती असून तूं त्याच्यापासून दूर राहूं पाहशील तर ती प्रतारणा त्याला कशी आवडेल? तो तुजवर कशी दया करील?"

प्रार्थना झाल्यावर मी उठलें व थेट डॉ. वालंटाइनसाहेबांच्या बंगल्यावर गेलें मला पाहून साहेब चकित झाले.

"साहेब, उद्यां आहे रविवार. माझा, दत्तुचा आणि हौशीचा उद्यांच्या उद्यां बाप्तिस्मा झाला पाहिजे. शास्त्राच्या परीक्षेंत मी उतरलें नाहीं तरी माझा ख्रिस्तावर भाव आहे. मी का खोटें बोलतें आहे?"

साहेबांनीं व मीं तेथेंच प्रार्थना केली व दुसऱ्या दिवशीं आमचा बाप्तिस्मा होण्याचें ठरलें. मी आनंदांत घरीं आलें. कोडें उठलें होतें म्हणून टिळकांनीं मला

खोगीर घ्या निजायला " हे जे मनरास आल्यावर तिच्या तोंडचे शब्द ऐकले तेवढेच. आम्ही आल्यावर ती आजारी पडली ती आमच्या वास्तिस्याचे वृत्त ऐकून अथरुणालाच खिळली. तिच्या मानी स्वभावाची व प्रेमळ स्वभावाची सांगड घालणें मोठें कठीण होतें. ह्या दोन वृत्तींचच तिच्यांत अंतस्थ तुमुल युद्ध चालून तिला हें दुखणें आले होते. नानासाहेबांचेंहि मजवर मुलीप्रमाणे प्रेम होतें. परंतु बायकोमुळे त्यांनींहि आमचें नांव सोडून दिलें होत.

ह्या सुमारास मला गोंवर आला. हें कळतांच नानासाहेबांना राहवेना ते कोणाला न सांगतांच चोरून मला भेटायला आले. एकमेकांना पाहातांच आम्हां दोघांनाहि मुसमुसाचे खूप हुंदके आले. ते बराच वेळ बसले मीं त्यांना म्हटलें माझी व माझ्या बहिणीची भेट करवा. मावशी, तें शक्य नाहीं. तुझ्याविषयींच्या दुःखांत धारमाईंच्या चितेची सुपारी पडली आहे.

माझ्या आठवणींत त्यांनेलपर्यंत माझ्या बहिणीच्या आयुष्यांत तिला चिंता काळज्या कधीं कराव्या लागल्या नव्हत्या. पण आतां एकले दो भले अमे झालें पाठची बहीण व पोटची मुलगी पण ह्याच दोन सुऱ्या तिच्या गळ्यावर ठेवण्यांत आल्या होत्या.

जावयानें घरांत एक बाई आणली. पैसा कलालाच्या दुकानीं जाऊं लागला. नोकरी गेली, घाटला अत्यंत ओंच होऊं लागला आणि त्यांच्या उदरभरणासाठीं नानासाहेबांना दरमहा बरीचशी ठराविक रक्कम पाठविणे भाग पडूं लागलें. इतकें करून पुन्हा मुलीला सुख नाहीं तें नाहींच. ह्या साऱ्या संकटाच्या भोवऱ्यांत सापडून माझी बहीण अगदीं भांगावून गेली. मी खिस्ती होण्यापूर्वी ती घरांतल्या घरांत फिरत तरी होती. पण माझ्या बाप्तिस्म्याचें वृत्त कानीं पडतांच तिनें अथरूण धरलें.

नानासाहेब घरीं गेले. गोवरांतून उठल्यावर एक दिवस मला नेण्यासाठीं त्यांच्याकडून टांगा आला. मी गेले. धारमाई माझी वाटच पाहात होती. आमच्या भेटींत उन्हापावसास पूर्ण भरती आली. आमचें प्रेमच तसें होतें. मी मावशी ती भाची. पण ह्याच नात्यांत मैत्रीची भर पडली होती व तिच्या दुःखानें तर तिला आतां कोणी तरी अगदीं जवळचें पाहिजेच होतें. माझ्यावांचून पोटातलें बोलण्यास तिला दुसरें कोणी नव्हतें. तेव्हां हसण्यावांचून व रडण्यावांचून त्या दिवशीं आम्हांला दुसरें कांहींच करतां येईना. अशा स्थितींत पुष्कळ वेळ

गेल्यावर ती आंतल्या खोलींत आपल्या आईकडे गेली व मी आल्याचें तिनें तिला सांगितलें. मी आल्याचें कळ्‌ल्याच भिरूताईनें भिंतीकडे तोंड फिरविलें वासुमाईनें तिची फार मनधरणी केली पण ती कांहीं बोलेना. ती निजली होती त्या माडीवर दुसऱ्या दालनांत घारूनें मला नेलें. मी तेथून डोकावून पाहिलें मी काय पाहात होतें! नानासाहेबांनीं सांगितलें तें खरेंच होतें! 'तिचें उद्यांचें मरण तूं आजला ओढवून घेशील.' त्यांचे हे शब्द मला सारखे भेडसावूं लागले. मी पाऊल न वाजवतां तिच्याजवळ गेले व हळूच तिच्याकडे डोकावून पाहूं लागलें. घारू तिला म्हणाली मावशी आली आहे. पण तिनें तोंड वळविलें नाहीं. तुसडें जातांना एवढें म्हणाली, "त्या महाराणीच्या पदरांत टाका कांहीं तरी."

ते दिवाळीचे दिवस होते. आणि आईनें सागण्याच्या आधींच पाटीभर फटाके व घरचेंसें फराळाचें माझ्याबरोबर देण्यासाठीं घारूनें काढून ठेवलें होतें. तिनें परात भरून हें सारें माझ्या ओटींत टाकलें मायेला लाज नसते. आतां दर सणावाराला वाढून येऊं लागलें व मी जवळ जवळ दररोज भिरूताईकडे जाऊं लागलें. दत्तूहि माझ्याबरोबर येत असे. हौशीहि कधीं कधीं येई. एक दिवस दत्तू एकटाच तिच्या खोलींत होता. तिनें आपलें आमच्यावरील प्रेम उलाळें असल्याचें दाखविण्याचे आटोकाट प्रयत्न केले तरी शेवटीं खरें तें त्या वेळीं बाहेर आलें. मला एकट्याला पाहून ती म्हणाली, 'ये बाळ माझ्या जवळ' तो जवळ गेला. 'आणखी जवळ ये.' तिनें आपलें पांघरूण वर केलें व म्हटलें, 'ये, माझ्या पोटाशीं चिकटून नीज.'

'पण मावशी तुला माझा विटाळ होईल.'

'होऊ दे झाला तर' असें म्हणून तिनें त्याला आपल्या पोटाशीं घट्ट धरलें. मी मधल्या दारांतून हें पाहात होतें. आम्ही दोघीहि दसदसां रडलों. पण तिनें मला पाहिलें नाहीं.

'दत्तू, तू आणि हौशी मला रोज भेटायला येत जा, तुझी आई नाहीं आली तरी चालेल.'

'येऊ हं मावशी.'

आणि त्यानंतर हीं दोघं रोज तिला भेटायला जाऊं लागलीं

पुढें पुढें मीहि तिला हवीशी वाटूं लागलें. आणखी कांहीं दिवसांनीं तर मी आलें नाहीं म्हणजे तिचा जीव कासावीस होई. पडल्या पडल्या मनीं

केव्हां येईल म्हणून खिडकींतून ती सारखी बाहेर पाहात राही. मी आतां कधीं कधीं रात्रंदिवससुद्धा तिच्याकडे राहूं लागलें. टिल्लूहि रोज येऊन तिला भेटत.

ज्या वहिणीला खोलीवर देण्यास तिनें सांगितलें होतें त्याच वहिणीला आता कोणी नुसतें जाजम निजायला दिलें तर तें तिला खपेनासें झालें. ती म्हणे, "का? ती वाटेवरची चोर आहे? तिला चांगला बिछाना द्या निजायला." माझ्याविषयीं कोणी कांहीं बोललें तर तिला फार वाईट वाटे. ती त्याची चांगली खरमरीत हजेरी घेई. एक बाई एक दिवस म्हणाली, "का? इतकें करून शेवटीं वहीण गेली ना निघून!" तिनें चटकन् तिला गप्प केलें. "निघून गेली म्हणजे कोणाचा हात धरून गेली का काय माझी वहीण?" पुढें पुढें तर तिच्या मनात माझ्याबद्दल कांहींहि किल्मिष राहिलें नाहीं. ती म्हणे, "मने, फार इसम झालें तूं गेलीस. आता माझी एक मोठी काळजी दूर झाली." टिल्लू आतां पहिल्यासारखे अस्थिर राहिले नव्हते. तेव्हा तिला आमच्या नव्या संसाराकडे पाहून आनंद होई. माझ्याबद्दल मनात आतां कांहीं राहिलें नाहीं. तरी एक गोष्ट मात्र परत मिळाली नाहीं. ती तिची सुदृढ प्रकृति. ती अधिकाधिक क्षीण होत चालली. शेवटीं तिला आपल्या जन्मभूमीला तरी बरें वाटेल म्हणून तिला नाशकास नेण्याचें ठरलें. मी स्टेशनवर तिला पोचवायला गेलें होतें. तेव्हाहि तिनें हेच उद्गार काढले कीं, "मने, फार चांगलें केलेंस. तूं आपल्या नवऱ्याकडे गेलीस." भिरूताई गेल्यावर टिल्लूकडून मी पत्रावर पत्रें धाडूं लागलें. पण पेंडशाचें कांहीं उत्तर येईना. जो भेटे त्याला मी वेड्यासारखी माझ्या वहिणीसंबंधीं विचारी. एक दिवस एक गृहस्थ सहज आमच्याकडे आले असतां अशीच मीं विचारपूस केली. तो म्हणाला, "तुम्हाला माहीत नाहीं का!"

"नाहीं, काय आहे? मला तिची फार काळजी लागून राहिली आहे!"

"अहो त्याना तर दहा बारा दिवस झाले आता!"

माझे हात पाय गळाले. मजवर वज्राघात झाला. माझ्याचमुळें तिला कष्ट, आजार व शेवटीं मृत्यु आला, तेव्हां मला ही बातमी ऐकून काय वाटलें असेल याची शब्दपेक्षा कल्पनेनेंच चांगली जाणीव होईल.

टिल्लूनीं तार केली. तिचें उत्तर पत्रानें आलें कीं माझी रजा संपली, मी दोन तीन दिवसात येतों. नाशकास कर्मठपणा अधिक म्हणून मुद्दाम मला आधीं

त्यांनीं कळविलें नव्हतें. आपण कळविलें आणि ही उठून नाशकास आली म्हणजे त्या दुःखाच्या प्रसंगांत हिच्या शिवादिवीचा आणखी गोंधळ असें त्यांना वाटलें.

पेंडसे आले. त्यांना मी भेटायला गेलें. एकमेकांना पाहून आम्हांला जें काय वाटलें तें वर्णन करून सांगताच येणें शक्य नाहीं.

पेंडशांना जेवायला दुसरीकडे जायचें होतें पण ते मला जेवल्यावांचून घरीं जाऊं देईनात. 'मावशी, तुझा मेव्हणा वारला व बहीण जिवंत आहे असें समज. मी तुला मुळींच अंतर देणार नाहीं.' असें म्हणून ते माझें जेवण होईपर्यंत मजजवळ बसून राहिले.

— १० —

# परमेश्वरी योजना

देवानें माझी आणखी एक हौस पुरविली. माझ्या शेवटच्या मुलानंतर दहा वर्षें घरात तान्हें मूल नव्हतें. भावाच्या येथें बालगोपालाची हौस फिटत होती. पण अगदीं स्वत चें म्हणावयाला देवानें आता लहान मूल दिलें हिचें नाव तारा ठेवलें. तारावर आम्हा दोघांचें प्राणापलीकडे प्रेम तिच्या बाळपणीं आम्ही दोघांनीं तिच्या खस्ता खाऊन तिला वाचविली. तारा तीन आठवड्याची होती. तिला महाबळेश्वरची थंडी सोसणार नाहीं व नगरचें ऊन सोसणार नाहीं म्हणून आम्ही वाईस जाण्याचें ठरविलें. तेथें आबासाहेबांनीं आमच्यापाठीं घर ठरवून ठेवलें. तेथें गेल्यावरहि टिळकांचीं व्याख्यानें, उपदेश, संभाषणें व लेखन हीं चालूच होतीं त्यामुळें त्यांचा पाय नेहमीं घरात ठरतच असे असें नाहीं.

एक दिवस एक बाई आली टिळक घरीं नव्हते. ख्रिस्ती लोकात आता मीं एक वर्षावर दिवस काढले असल्यानें त्या समाजातील पुष्कळ रीतीरिवाज माझ्या ध्यानात आले होते. बाई आल्याबरोबर मीं तिचें स्वागत केलें. शेकहँड करण्यासाठीं हात पुढें केला खुर्चीं पुढें सारली. पण बाईनें उलट आपला हात पुढें केला नाहीं, की ती घरांत आली नाहीं तिनें विचारलें, "साहेब कोठें आहेत?" मी म्हणालें, "ते बाहेर गेले आहेत." "त्यानीं मला कामाला बोलाविलें आहे—"

मला फार आश्चर्य वाटलें. काय विचित्र बाई आहे! घरात आली नाहीं, शेकहँड केला नाहीं. हिच्या अंगावर दागिने तरी किती! सरी, पाटल्या, पुतळ्याची माळ, नाकाकानतलें, नेसू लुगडें चागलें पचवीस रुपयांचें! ही बाई आमच्या घरीं काम तरी काय करणार! असेल काहीं लिहिण्याचें काम अशी मीं मनाची समजूत करून घेतली.

सध्याकाळीं टिळक आल्यावर विचारू लागले, "भंगीण आली होती का? माझ्या मुलीचे मळीत कपडे धुवायला तिला उद्यापासून बोलाविलें आहे" माझ्या भ्रमाचा भोपळा फुटला "ती भंगीण का होती? मीं तिला बसायला खुर्ची दिली अन् शेकहँडकरता हात पुढें केला पण ती आपली गप्पच. मोठें लुगडें नेसली असल्यामुळें ती कोणी ख्रिस्तीच बाई असावी असें मला वाटलें. पण हातांत मोहोरेची अंगठी पाहून बाई हिंदु वाटे. म्हणून माझा असा घोटाळा झाला."

दुसऱ्या दिवसापासून भंगीण कामाला येऊं लागली. अंगण झाडणें, मुलीचे मळीण कपडे धुऊन आणणें, वगैरे कामेंहि ती करूं लागली. मीं एक दिवस तिला विचारलें—

"काय ग, तूं इतकी स्वच्छ अन् नीटनेटकी दिसतेस, तसें तुझें घर आहे का स्वच्छ?"

"बाई, असाच चलतां का माझ्या घरीं? नाहीं तर तुम्ही म्हणाल मी आधीं झाडून सारवून मग तुम्हांला दाखविलें. चला अशाच्या अशाच."

मी तिला घेऊन तिच्या घरीं गेलें.

ती वस्ती कोणत्या लोकांची होती ह्याची मीं चौकशी केली नाहीं. पण तेथील घरेंदारें व रस्ता अगदीं स्वच्छ होता. तिच्या घराचे दरवाजे मोठे होते. आंतमध्यें तांब्यापितळेचीं, पाणी पिण्याचीं भांडीं अगदीं चकचकीत होतीं. घरांत लिंपोतेंरें केलेलें, भांड्यांचीं तुळें घेतलेलीं, अंगणांत सडा टाकलेला, दारीं तुळशीवृंदावन, हें सारें पाहून मी आश्चर्यानें थकच झालें. स्वच्छता, टापटीप हीं जातीपेक्षां व्यक्तीवर आहेत असें जें माझें मत होतें तें आतां अधिक दृढ झालें.

ह्या क्षेत्राच्या ठिकाणीं कोयनाकृष्णेचा संगम होतो. तसें माझें झालें. मीं त्या भंगिणीच्या गळ्यांत मिठी मारून विचारलें, "का ग, तुम्हीं आमच्या हातचें कां खात नाहीं?"

"बाई, आमची जात नांवें ठेवते!"

"पण आतां कांहीं हरकत आहे का?"

"बाई! तुम्ही खाल माझ्या हातचें?"

"हो! काय झालें?"

झालें. म्हटल्याप्रमाणें त्या भंगिणीनें फराळाचें करून आणलें. टिळक महाबळेश्वरला डॉ. ह्यूमला भेटायला गेले होते. मीं तें फराळाचें घेतलें. घरांतील चाकर नोकर कुरकूर करूं लागले. मीं त्यांना सांगितलें, "तुम्हांला नको असेल तर माझा कांहीं आग्रह नाहीं. मी न् माझीं मुलें खाऊं." आणि दत्तू, हौशी व मी आम्हीं तिघांनीं तें फराळाचें खाल्लें. आपल्या हातचें ह्या बाईनें इतक्या प्रेमानें खाल्लें म्हणून भंगिणीलाहि फार आनंद झाला.

टिळक दुसऱ्या दिवशीं परत आले. त्यांना हें कळलें तेव्हां ते म्हणाले, 'तूं तर माझ्याहि पुढें गेलीस!'

* * *

मोठ्या दोघी मुली शाळेंत जाऊं लागल्या. आम्हांला ह्या मुलींकडून कांहींचाहि त्रास झाला नाहीं. त्यांनीं चोरी, लबाडी, वगैरे कधींच कांहीं केलें नाहीं. घरांत अगदीं घरच्यासारखें त्या वागत. शाळेंत जायच्या त्या सरळ शाळेंत जाऊन सरळ घरीं परत यायच्या. मध्ये कधीं कोणाकडे गेल्या नाहींत कीं कमलाच चवळरणा त्यांनीं केला नाहीं. घरांत थुंकतील, वाटे खरकटें जिकडे तिकडे टाकतील असा जो मला धाक होता, तो अगदीं अनाठायीं ठला. जसें आम्हांला वागतांना पहावें तसाच त्या वागत. शेण लावणें, खरकटें हात पुसें, वगैरे गोष्टी न सांगतां त्या शिकल्या. चटण्या, कोशिंबिरी, लोणचीं, पापड त्यांना करतां येऊं लागलीं. स्वैपाकांतसुद्धां त्या हुशार झाल्या.

पुढें पुढें दुष्काळाचें स्वरूप फारच उग्र भासूं लागलें. त्यांतच मिशनला कांहीं तूट आली का कांहीं झालें, पण त्यांनीं बोर्डिंगमधून कांहीं मुलें काढून टाकलीं. गांवांत जिकडे तिकडे खळबळ उडाली. मुलांना कोठेंच कांहीं आधार नव्हता. ही बातमी ऐकून टिळकांना फारच वाईट वाटलें. ते मजकडे आले व म्हणाले अशीं अशीं बावीस मुलें मिशननें एकाएकीं आपल्या शाळेंतून काढून टाकलीं आहेत. तीं उपास करून मरतील, आतां काय करायचें ?

त्या दिवशीं आमच्याजवळ शिल्लक सव्वा रुपया व घरांत सांठवणींत सव्वाशेर ज्वारी होती. पण आमची मोठ्यांत मोठी शिल्लक म्हणजे देवावरचा विश्वास ही अगदीं भरपूर होती. आम्हीं दोघांनीं जमिनीवर आपलीं मस्तकें ठेवून मनोभावें परमेश्वराची प्रार्थना केली. नंतर दोघांनीं एकमेकांना वचन दिलें कीं आपलें अन्न व ह्या मुलांचें अन्न ह्यांत कांहींच फरक करायचा नाहीं. जी काय ज्वारीबाजरीची भाकरी मुलांना मिळेल तीच आपणहि खायची.

दत्तूला बोलावून आम्हीं आमच्या जवळ घेतला, त्याला सांगितलें, " बाळ, पाहा तुझे भाऊ अन्न उपाशी रानावनांत फिरत आहेत. आम्ही त्यांना आपल्या घरीं आणणार आहों. ते जें खातील तें तुला खावें लागेल. खाशील ना ? " दत्तू म्हणाला, " हो. मी त्यांच्याबरोबर जेवीन खाईन. मांडणार नाहीं. " आणि पुढें मुलें आणल्यावर तीं जाईपर्यंत तीं खात तेंच अन्न दत्तूनें खालें व आपलें वचन पाळलें.

मुलांना उधार कापड आणून कपडे शिवले. कोट, पाटलोणी, टोप्या, शर्ट, वगैरे सर्व सरंजाम जिथल्या तिथें केला होता. इतकेंच नाहीं तर पुस्तक्या कष्या

मागवून बाजीस गाद्या शिवल्या. अर्थात् त्यांना तितक्याच सतरंज्या, उशा, ब्लँकेटें, ही सारी मंडळी आलीच. प्रत्येकाचीं जेवणाचीं व पाणी पिण्याचीं भांडीं वेगळीं घेतलीं. भिक्याशास्त्रीबोवांनाहि हें सर्व सामान अगदीं त्यांच्या शरीराच्या प्रमाणांत घेतलें. भिक्या सर्वांना फार आवडे. पण तो अत्यंत मट्ठ असल्यानें टिळक त्याला चांगला बडवीत. कारण ह्याला शास्त्रीबोवा बनवायचा असा त्यांचा संकल्प आणि त्याला तर ' रामः रामौ ' हि येईना. त्याला रोज पहाटे चार पांचला उठवून टिळ्कांनीं संथा द्यावी. पण तो कधीं ' रामः रामौ ' च्या पलीकडे गेला नाहीं. आधीं संस्कृत, मग ' फराळ ', मग भिक्याचें सुरेल गाणें व टिळकांचा आग्रह आणि शेवटला प्रवेश म्हणजे आम्हीं सगळ्यांनीं मिळून केलेली शेंपाची समजूत. अशा रीतीनें हा साम्र-संगीत फराळाचा प्रयोग म्हणजे एक रोजची करमणूकच होऊन बसली होती सगळ्यांची.

कामाला दोन बाया होत्या. पण त्यांना सारें काम आटपत नसे. मी त्यांच्या बरोबरीनें काम करीं. दळणाचा फार त्रास होऊं लागला. बाहेर दळण्यास द्यावें तर तितका खर्च वाढतो. तेव्हां आमच्या मुलांची मीं सभा बोलावली व तिच्यापुढें हा प्रश्न ठेवला. आणली एक बाई दळायला ठेवावी लागेल. म्हणजे तुमच्यांतला एक मुलगा काढावा लागेल. दळण तर आम्हांला आटपत नाहीं. आपल्याला रोजचें तीन पायल्यांचें पीठ लागतें. तेव्हां बाई ठेवायची नसली तर लहान मुलांनीं दोन पायल्या दळावें व मोठ्या मुलांनीं आम्हांला दोन पायल्या मोठ्या जात्यावर दळूं लागावें. हें म्हणणें मुलांना पटलें. तितकाच आमचा खर्च वांचला. कधीं मुलें आजारी पडलीं तर त्यांचे कपडे धुण्याचें काम मी करीं. कारण भंगीण आणली तर तिला पैसा द्यावा लागणार, तो वांचून तेवढाच आमच्या भाजीला झाला.

मुलांचा व आमचा संसार अशा रीतीनें फार प्रेमाचा व सुखसमाधानाचा चालला असतां मधेंच एक संकट आलें. माझी जशी टिळकांच्या बाबतींत पैशासंबंधीं तक्रार होती, तशी डॉ. ह्यूम ह्यांची आम्हा दोघांसंबंधीं व विशेषतः माझ्यासंबंधीं होती. त्यांना वाटे मी व्यर्थ पैसे उडवितें.

त्यांचें टुमणें सुरू झालें कीं हीं मुलें सोडून द्या. तुमचा पगारच तुम्हांला तुमच्या संसाराला पुरत नाहीं. आम्हीं म्हणावें, "आम्हीं सोडणार नाहीं. जोंपर्यंत त्यांची व्यवस्था लागत नाहीं तोंपर्यंत आम्ही त्यांना संभाळणार."

असो पुढें कांहीं दिवसानीं डॉ ह्यूमसाहेबांचें पत्र आलें कीं आपण मुलांची बोर्डिंगमध्यें व्यवस्था करतों

पत्र आलें तेव्हां आम्हां दोघांना फार वाईट वाटलें, आनंदहि झाला होता मुलें जाणार म्हणून दुःख व त्यांची चांगली व्यवस्था लागली म्हणून आनंद तेवढ्यातल्या तेवढ्यात आनंदाची आणखी एक गोष्ट म्हणजे ज्या बोर्डिंगांत हीं मुलें जाणार तें आमच्या घराच्या अगदीं नजीक होतें

त्या दिवशीं मुलें जाणार म्हणून त्यांच्यासाठीं केशरी भात केला मध्यरात्र उलटून जाईपर्यंत आम्ही सगळीं बोलत बसलीं होतों बोलतां बोलता आमच्या सगळ्यांच्याच भेटीला गंगायमुना येत होत्या शेवटीं टिळकांनीं प्रार्थना केली व आम्ही सगळे आपापल्या बिछान्यावर जाऊन पडलों आमचें हें एक मोठें थोरलें कुटुंब दुसऱ्या दिवशीं मोडायचें होतें सर्वांना एकमेकांचा छंद लागला होता

दुष्काळानंतर नगरांत प्लेगनें कहर उडवून दिला टोंचणी सुरू झाली टिळक टोंचणीच्या विरुद्ध होते त्यांनीं दत्तूला राहुरीस एका गृहस्थाकडे ठेवलें टिळक बाहेरगांवीं गेले असतां मी व कामदारणीनें टोंचून घेतलें बेबीला ताप आला होता म्हणून तिला टोंचलें नाहीं

टिळक परत आले तेव्हां सगुणाबाई येऊन सांगू लागली कीं तारा धावत सुटते व म्हणते मला देवळांत न्या व चांगले कपडे घाला. पाहावें तों तिला भयंकर ताप भरलेला ! कांहीं विचारावें तों ती बोलेना टिळक सगुणाबाईवर संतापले

"सुया हिला घेऊन फिरतेस त्यामुळें हा ताप आला आतां कांहीं झालें तर देशील का माझी मुलगी भरून ?

सगुणाबाई बिचारी एक अक्षर न बोलतां स्वस्थ बसली तिला त्यांचा स्वभाव माहीत होता.

आतां मोठी काळजी येऊन पडली घरांत पैसे मुळींच नव्हते ताराला प्लेग झाल्याचें चिकडे तिकडे पसरलं टिळक म्हणाले कोणी आपल्याला येथून जा म्हणायच्या आधीं आपणच गेलेलें बरें आम्हीं प्रार्थना केली टिळक म्हणाले ह्यांतहि परमेश्वराची कांहीं विशेष योजना असेल

इतक्यात दारावरून झपझप पावलें टाकीत एक माणूस चाललेला दिसला. आमच्या घरीं कोणी फिरकत नव्हतें. ह्या गृहस्थाला मीं कधीं तीन रुपये उसने दिले होते. मी धावत धावत कंपाउंडच्या भिंतीशीं येऊन त्याला थांबविलें! त्याला आत बोलाविलें नाहीं कारण आंत येण्याची त्याची इच्छा नव्हती हें त्याच्या चारपण्यावरून दिसत होतें. मीं त्याच्याजवळ माझे तीन रुपये मागितले. त्यानें चरकन् पाचाची एक नोट काढून माझ्या हवालीं केली व तो निघून गेला. मला तरी दुसरें काय पाहिजे होतें ? त्या वेळीं प्लेगला लोक फार भीत असत.

मी जशी कांहीं कोठें परगांवींच हवा बदलायला निघालें होतें. पाव्या परवंट्यापासून सर्व सामानाची एक गाडी भरून सेग्रिगेशन कँपवर ती पाठवून दिली ! इतकें करता करता चाराचा सुमार झाला. सगुणाबाईला टांगा आणण्यास पाठविलें पण टांगा कांहीं मिळेना. इतक्यात सामानाची गाडी परत आली! "इतकें सामान तेथें ठेवूं देत नाहींत. नेवाचें काढून घेतलें व बाकीचें परत पाठविलें." असें माणूस सांगूं लागला. पुन्हा सामान ब्रतरून ठेवावें लागलें.

अंधार पडला. टिळक कँपवर जाऊन कंदील लावून कांहीं लिहीत बसले. आम्ही गाड्याची वाट पाहात होतों. मीं सगुणाबाईला म्हटलें, "सगुणाबाई, रात्र पडून गेला आहे. तुला जर भीति वाटत असेल तर तूं आपली जा." ती म्हणाली, "बाई, मरण कांहीं कोणाला चुकत नाहीं. पण दुष्काळांत तुम्हीं जो मला अन् माझ्या मुलीला आसरा दिला तो माझ्या स्मरणांतून जाणार नाहीं. मी कशी बरं बेमान होईन?" एका अडाणी बाईचें केवढें मोठें मन हें! आम्हीं सभाळलेल्या मुलांच्या कानावर जेव्हा आमची अडचण गेली तेव्हा तीं म्हणालीं, दुष्काळांत ज्यांनीं आपल्या तोंडचा घास आपल्याला काढून दिला त्यांच्यावर हा प्रसंग आहे. आपण त्यांच्या साह्याला धावून गेलें पाहिजे. असें ठरवून ते बोर्डिंग मास्तरकडे परवानगी मागावयास गेले. मास्तर म्हणाले, "तुमचें करणें अगदीं बरोबर आहे ह्याबद्दल कांहीं वाद नाहीं पण अशा परिस्थितींत मला परवानगी देता येत नाहीं. तुम्ही उद्या साहेबाला विचारा." मुलें म्हणालीं, "त्यांना गरज आहे आज अन् उद्या साहेबाला विचारून काय करायचें !" मास्तरांनीं सांगितलें "तुम्हाला वाटेल तें करा. मी मात्र परवानगी देत नाहीं." उलट मुलांनीं म्हटलें, "आम्हाला जरी बोर्डिंगांत परत घेतलें नाहीं तरी चालेल, आम्ही जाणार." असें सांगून मुलें आमच्या साह्याला निघून आलीं.

" कां रे बाबानो कां आलां ?"

" तुम्हाला साह्य करायला "

" जर तुम्हांला उद्यां काढून दिलें तर ?"

" देव आमच्याबरोबर आहे."

" बरं तर. आतां कांहीं लागा, गाडी पाहा." एकानें बैलगाडी आणली. त्याची बोली होती कीं प्लेगचा रोगी गाडींत घ्यायचा नाहीं. थोडी थंड हवा लागतांच बेबी बोलूं लागली. गाडीवाल्याचा समज झाला कीं रोगी पुढें गेला. ती सर्व मुलांची त्यांचीं नांवें घेऊन बोलूं लागली. मला वाटलें आपण उगाच हिला घेऊन चाललो. ही तर चांगली धडाधड बोलते आहे. ती कांहीं बोलायची, मुलें उत्तर करायचीं अशा रीतीनें मजेंत आम्ही चाललों होतों. अंधार गुडुप पडला होता. जवळ कंदील नव्हता. गाडीची खडखड, मुलीची बडबड व माझ्या उरांतील धडधड अशा थाटात खाचखळग्यांतून आम्ही पुढें दिसणाऱ्या कंदीलाच्या धोरणानें कँप गाठला आमचें स्वागत करण्यास एका झोपडींतून लिहिता लिहिता टिळक उठून सामोरे आले. ते म्हणाले, " आपल्याला तीन झोपड्या मिळाल्या. एक स्वैंपाकाला, एक ताराला व एक मला लिहिण्यासाठीं."

डॉक्टरनें येऊन ताराला तपासलें. तिला १०५ डिग्री ताप होता. ते म्हणाले, " बाई, तुम्ही मुलीजवळ राहूं नका. तुम्हाला प्लेग होईल. ही बाई मरेल." मी म्हणालें, " कां ? ही कोणाजवळ बसली होती म्हणून तिला हा प्लेग झाला ? आणि दुसरीकडे मी राहिलें तर मला कशावरून होणार नाहीं ? आणि मी जर हिला सोडून दूर राहावयाचें तर ह्या कामाच्या बाईनें काय म्हणून तिच्याजवळ राहावें ?"

डॉक्टर गप्प झाले मुलें व दया गेलीं. झोपडींत मी, सगुणाबाई व तारा होतों. टिळकांनीं त्या मंडळीला खाण्यास नेऊन दिलें व कांहीं आम्हांला आणून दिलें. पण कशाचें तें खाणें आणि कशाचें पिणें. पौषाचा महिना. कडाक्याची थंडी. सकाळची वाळलेली ज्वारीची भाकरी व येथील खापराच्या घागरींतील बर्फासारखें थंडगार पाणी मनांत नाना प्रकारच्या काळज्या. गाडीला दोन रुपये दिले. आतां जवळ एक कवडी नाहीं. झोपडीच्या खाटीं व वर हात हात जागा मोकळी कारण काय म्हणे तर व्हेंटिलेशन ! त्या झोपड्या सर्व पऱ्याच्या होत्या.

रात्रींतून त्या इतक्या थंडगार व्हायच्या कीं आंतील सर्वांनाच खरोखरचें थंड होण्याची पाळी यायची. तीन बाजूंस आजारी लोक. त्यांचें ओरडणें, पत्रे वाजविणें, इतकेंच नाहीं तर एखादा रोगी पथ्यावर चढून धपकन्‌ दुसऱ्या खोलींत उडी मारायचा. खालीं जमीन फेकलेली नाहीं. जमिनीवरील गोटेगोटे पायांना बोचायचे. पोटांत अन्न नाहीं. डोळ्यांना झोप नाहीं. मुलीच्या आरोळ्या चाललेल्या. मला वाटलें खरोखर यमपुरी जर कोठें असेल तर ती येथेंच आहे. ती जागा भेसूर, ती रात्र भेसूर, भोवतालची परिस्थिति भेसूर आणि तिनें बनविलेलें स्वतःचें मन भेसूर ! रोग्यांबरोबर त्यांचीं माणसेंहि ओरडत व भांडत. अहो तुमचा रोगी फार ओरडतो त्याला गप करा, आमच्या रोग्याचा आत्तांशा कोठें डोळा लागला आहे. कोणी खरेच आजारी तर कोणी घाबरून ओरडायला लागलेले.

दुसऱ्या दिवशीं डॉक्टर आले तेव्हां मी त्यांना म्हणालें, "अहो डॉक्टर, तुम्ही आपले रात्रीं स्वस्थ घरीं जाऊन निजतां पण येथें काय चाललेलें असतें त्याची तुम्हांला कांहीं कल्पना आहे का ?" त्यांना मीं सर्व चित्र वर्णन करून दाखविलें व कांहीं तरी झोपेचें औषध द्या म्हणून सुचविलें. डॉक्टरांनीं माझ्या या सूचनेप्रमाणें दुसऱ्या दिवसापासून औषधांत कांहीं बदल केला व रात्री शान्त जाऊं लागल्या.

दवाखाना तेवढ्या तेथेंच होता. औषध म्हणजे येताडोना असे. तें औषध, थर्मामीटर व औषधाचा ग्लास हीं सार्‍या रोग्यांची एकच असत. मीं मात्र बेबीसाठीं हीं सारीं निराळीं ठेवलीं होतीं व स्वतः जाऊन औषधें आणीत असे. झोपडींत शेगडी ठेवली होती व मी तिला गरम कपड्यानें फोमेंट करीत असे. सगुणाबाई नाहीं तर मी तिला एकसारख्या मांडीवर घेऊन बसलें होतें. तेथें दहा दिवस रोग्यांना व त्यांच्या बरोबरच्या माणसाला तेथलेंच खाणें मिळत असे. आम्हांला शिधा मिळे व दया स्वैंपाक करी. आम्ही चांगलीं दहा माणसें होतों. त्या सगळ्यांचा ती एकटी स्वैंपाक करी. आमच्याकडे येण्याची कोणाला परवानगी नव्हती. पण कोणी नाहीं असें पाहून मुलें इकडूनच तारेंतून आंत येत व भेटून जात.

टिळकांचें लेखन, वाचन व प्रार्थना सुरूच होत्या. ते म्हणत, "देवा, हें संकट तूं कां आणलेंस हें अजून माझ्या ध्यानांत येत नाहीं. पण झांत एखादा

कांहीं तरी हेतु आहे, एवढें कळतें तो हेतु समजण्याची मला बुद्धि दे तुला ह्यात कांहीं हेतु नसता तर आम्हा दोघांपैकीं एकालाहि रोग न होता तो ह्या लहान मुलीलाच का झाला असता ! "

चौदा दिवस झाले सिव्हिल सर्जन आले त्यानीं व दुसऱ्या डॉक्टरानीं मुलीला तपासलं व सांगितलें कीं आता हिची आशा नाहीं.

टिळकांना मळमळून आलें देवानें आपल्याला एक मुलगी दिली तिला आनंदीबाई जोशाप्रमाणें आरोग्य शिकवूं अशी मोठी आशा मनात धरली आणि ती मुलगी देवानें नेली आता ही चालली

सगुणाबाई दूर जाऊन रडत बसली तिला पेटीचा लळा लागला होता इतके दिवस माझ्यावरोबर तिनें तिच्या खस्ता खाल्ल्या हात्या

माझी वृत्ति भरपुरीची आहे कपडे करायचे झाले तरी मी ते अगदीं वाढत्या अंगाचे करवितें कोल्हाप्या शिकारीला जायचें झालें तर मी वाघाच्या शिकारीची तयारी करतें घरून निघताना मी एक शेर जवसाचें पीठ, कॅस्टर ऑईल, कोळसे अशा बऱ्याच उपयोगी जिनसा आणल्या होत्या

मीहि निराश झाले दहा पधरा दिवसात पेटीची पाठ जमिनीला लागली नव्हती आज तिला मीं खालीं निजविलें ती शाव पडली होती शेगडी पेटलेलीच होती मीं तें सारें जवसाचें पीठ शिजविलें गळ्यापासून सर्व छातीपोटावर तें पोटीस घातलें एरंडेल, दूध साखर गरम करून तिच्या पोटात घातलें पायाशीं शेगडी ठेवली ब्लँकेटनें तिला चांगलें गुंडाळून घेतलें मग तिला सांगितलं, " आता तू खुशाल मर माझ्या मनाला असुक एक केलें नाहीं असें वाटायला नको ! "

मग दार लावून तिला एकटीलाच आत टाकून मी दूर रानात निघून गलें अगदीं एकान्त मिळाल्यावर गुडघे टेकून मोठ्यानें आरोळी मारून देवाजवळ प्रार्थना केली कीं, " देवा बापा ही पोर जगू दे ही माझी नाहीं तुझी आहे तूच ती मला दिली होतीस व मीं तिचें लालनपालन केलें तुझी इच्छा असेल तर तू तिला नशीलच हिला जर आराम पडला तर मी येथ आनान्याचें काम करीन, " असें म्हणून मी गळा काढून मनमुक्त रडलें

थोड्या वेळानें मी परत आलें खोलीचें दार उघडण्यास मला धीर होईना गुडघे टेकून अशी प्रार्थना मीं पूर्वी कधींच केली नव्हती उरात धडकी भरली

होती. मोठ्या जुलमानें मीं दार उघडलें. पण मीं दार उघडतांच तिनें हांक मारून विचारलें, "ममा, तूं कुठें होतीस? पपा कुठें आहेत?" लहानपणीं ती मला ममा म्हणत असे व त्यांना पपा म्हणत असे. मला इतका आनंद झाला कीं तिला उचलून घ्यावी असें वाटलें. पण तिच्या हार्टवर एकाद्वेळेस वाईट परिणाम होईल हें चटकन ध्यानांत येऊन मी तशीच दार लावून धावतच टिळकांच्या खोलीकडे गेलें. तेथें टिळक इतर मंडळीबरोबर प्रार्थना करीत बसले होते.

मला पाहून त्यांना वाटलें मुलगी आटोपल्याची बातमी सांगायला ही आली असावी. मीं त्यांना हसत हसत सांगितलें, "येवी तुम्हांला बोलावते आहे." पण त्यांना तें खरें वाटेना. माझें हसणें व बोलणें त्यांना वेड्यासारखें वाटलें. मी पुष्कळच हसत होतें व पुन्हा पुन्हा सांगत होतें कीं येवी बोलावते आहे. शेवटीं आम्ही दोघें ताराच्या झोपडींत गेलों. त्यांना पाहातांच ती म्हणाली, "पपा, तुम्ही मला टाकून कुठें गेलां होतां? मला आंबे आणा."

टिळकांनीं एक रुपया देऊन मुलांना बाजारांत मोसंबीं आणण्यास पाठविलें. पण बाजारांत सारा शुकशुकाट होता. मोठ्या पंचाईतीनें त्यांना अगदीं बारीक बारीक वाळलेलीं अशीं पांच सात मोसंबीं मिळालीं.

दुसऱ्या दिवशीं डॉक्टर आले. त्यांनाहि फार नवल वाटलें.

आठ्या दिवसांनीं ती झोपडी सोडली. देवानें मुलीला प्लेग कां आणला याचें उत्तर टिळकांना मिळालें तें असें—

एक दिवस कँपमध्यें दुधापरून तक्रार झाली. ती गडबड ऐकून टिळक तेथें गेले. ते म्हणाले, "पाहूं वही!" त्यांना उत्तर मिळालें, "साहेब, तुम्हांला समजणार नाहीं." तरीच त्यांनीं वही हिसकावून घेतली आणि पाहातात तों वहींत आंकडा मोठा, प्रत्यक्ष दूध कमी! टिळक मला येऊन म्हणाले, "माझ्या प्रार्थनेचें उत्तर मिळालें. ताराला कां प्लेग झाला तें समजलें. आपल्या इकडे विश्वासू माणसेंच कमी. दोन रुपयांपासून शंभर रुपयांपर्यंत एकावर देखरेख ठेवायला दुसरा लागतो. तसेंच येथें आहे. रोग्यांची उत्तम व्यवस्था झाली, त्यांचे खाण्यापिण्याचे हाल झाले नाहींत तर रोगी दगावणार नाहींत. आतांच पाहिलें, दूध कागदीं तिप्पट तर प्रत्यक्ष एकपट. न्हाव्याभटांची सिंहस्थाची पर्वणी तशी ह्या गुलामांची ही प्लेगची पर्वणी आली आहे. माझा झाला निश्चय कीं येथें राहून रोग्यांचें परदेखरेख हें काम करायचें! तुझी आहे तयारी?"

मी म्हणालें, 'हो, माझी आहे तयारी!' देवानें दोघांना त्या प्रसंगीं फारच धैर्य दिलें व मोठें मन दिलें. ज्याला कोणत्याच रोगाचें भय नाहीं, कसल्याच घाणीची पर्वा नाहीं असावें— म्हणजे भंग्याचें—मन त्यानें आम्हांला त्या वेळीं दिलें. आई देईल तें काम करण्याचा कंटाळा करील तें हा गरीब मनुष्यप्राणी आपल्या कृतघ्न बांधवांसाठीं करीत असतो.

आम्हीं दोघांनीं आपल्या कामाला मनापासून सुरुवात केली.

कँपाजवळच आम्हांला एक झोपडी बांधून देण्यांत आली होती. पण आतां शिधा बंद झाला होता. पाण्याची पखाल चालूच होती. मुलें साहेबांनीं परत नेलीं. सगुणाबाई आपल्या मुलीला भेटायला आपल्या देशेगांवीं गेली. टिळकांनीं तिला जातांना छुगडें चोळी घेतली, खर्चाला चार रुपये दिले, पगार आठ आणे होता तो दोन रुपये केला व चार महिने भरपगारी रजा दिली.

आतां आम्ही चार माणसें कुटुंबांत उरलों. पण तेथेंहि नाहीं नाहीं म्हणतां दोन मुली मीं संभाळण्यास घेतल्या. दोघींच्याहि आया तेथेंच प्लेगला बळी पडल्या होत्या.

आम्ही दोघेंहि रोग्यांची पडेल ती सेवा करीत होतों. त्यांचें सार्वांगिर्गे, औषधपाणी, त्यांचीं तोंडें धुणें, त्यांना 'स्नानपान' देणें व वेळ पडली म्हणजे त्यांचा दोणगोठा करणें हीं सारीं कामें आमच्याकडे होतीं. तेथें सर्व धर्मांचे व सर्व जातींचे लोक येत व आम्ही तेथें आहों हें समजल्यावर त्या कँपची भीति लोकांत कमी होऊन अधिकाधिक रोगी येऊं लागले. ते आमच्याच नांवावर रात्रीं कोणत्याहि वेळेस येऊं लागले. सिद्धिकशेटनीं आम्हांला गरम कपडे करून पाठविले. आम्हीं मागितले नव्हते. पण स्वतःच त्यांनीं ते पाठविले.

तेथें कँपांत एक तेली कुलपांत म्हातारी बंद करून ठेवलेला होता. त्याला जाऊन नुसतें पाणी पाजायला सुद्धा कोणाला धैर्य होत नसे. आम्हीं आमच्या हातांत व्यवस्था आल्याबरोबर एक नवीन नर्स आणविली. ही खिस्ती होती व म्हातारी मनापासून काम करी. पहिल्या दिवशीं मी व जाईबाई त्या तेल्याच्या झोपडीकडे जाऊं लागलों. तों तेथें दारांतच एक शिपाई! तो म्हणे कीं, "बाई, आंत जाऊं नका. तो माणूस फार भयंकर आहे." आम्हीं म्हटलें, "भयंकर असो कीं कसाहि असो, त्याला दूध देणें, औषध देणें हें आमचें काम आहे. कुलूप उघडा." सांगितल्याप्रमाणें त्यानें कुलूप उघडलें.

"सांभाळा वरं. तो अंगावर धावून येतो."

आणि दार उघडल्यावर खरोखरच तो आमच्या अंगावर धावून आला. तो तसा येतांच मीं खाडकन् त्याच्या तोंडांत लगावली. काय झालें कोणास ठाऊक पण तो चटकन् पायां पडूं लागला. दूध घे म्हणतांच त्यानें मुकाट्यानें दूध घेतलें. औषध देतांच औषध प्याला !

एक नाना सोनार म्हणून होता. तो म्हणे, " आई, मला घरं बांधूं दे, तुला सोन्यानें मढवून काढीन. आम्ही बोलून चालून सोनार. आमचा एक हात सोन्याचा तर दुसरा चांदीचा." मी म्हणें, " बरं बाबा, काढ मला सोन्यानें मढवून. पण सध्या तूं सोन्यानें मढविलेल्या भिंती मात्र मला धुऊन काढायला लावतो आहेस."

अडचणीच्या वेळीं चाकरांना अडवून धरतां येतें. पगार वाढवावा म्हणून एक दिवस भंग्यांनीं एकदम संप पुकारला. बसले ते आपले स्वस्थ हात जोडून. दोन दिवस टिळकांनीं व मीं भंग्याचें काम संभाळलें. तसें त्या सोनारानें आम्हांला तें 'ट्रेनिंग' देऊन ठेवलेंच होतें. तिसऱ्या दिवशीं मैलें उचलण्याची पाळी आली. टिळकांनीं आपली कंबर बांधली. मीहि पदर खोचला. दोन मैलें उचलून आम्हीं गाडींत घातलीं. आतां मात्र भंगी लोक चपापले, ते तात्काळीच धावून आले व म्हणूं लागले, 'साहेब, आमच्या पाठीवर मारा पण पोटावर मारूं नका.' टिळक म्हणाले, 'तुम्हांला अधिक पगार मिळूं नये असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. मात्र तुम्हीं अशा आणिबाणीच्या वेळीं शेट्यांना अडचणींत पाडणें तुमच्या माणुसकीला शोभत नाहीं. आम्ही तुमचा पगार वाढावा म्हणून अगदीं जरूर प्रयत्न करूं. हे तुमचे भाऊ मरताहेत आणि तुम्ही ह्या वेळेस अडवितां हें बरें नाहीं. आतां तुमच्या पगाराची मी खटपट करीन, पण जर वा पुन्हा असें केलेंत तर मात्र माझ्याकडून कांहीं मदत होणार नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा.'

टिळक हेंगच्या रोग्यांचें काम करूं लागले तेव्हां कोणी म्हणूं लागले, लेनीचा प्लेग टिळकांच्या फायद्यावर पडला. आतां काय ते खोऱ्यानें पैसे ओढीत आहेत. तर कोणी म्हणे पाहा बिचारा लोकांसाठीं कसा झिजत आहे. टिळक म्हणत,

" निंदास्तुतिचा जगीं तमाशा । फंदीं तूं त्या पडूं नको
मान घडो अपमान घडो तव । हसूं नको तूं रडूं नको.

रोगी चालले घरे दोऊ लागले. मृत्युमंच्या लागणीच्या दोरडा दहावर आली सर्व मंडळींचा फोटो घराला. कर्नल कॉर्कीनें टिळकांना एक सर्टिफिकेट दिलें टिळक म्हणाले, "मला काय करायचें तुमचें सर्टिफिकीट !" पण त्यांनीं योंदीहि फार आभार मानून सर्वेचर्चे त्यांच्या हातात तें ठेवलें. टिळकांनीं तें पत्रांच्या तारेला लावून ठेवलें होतें पण रद्दी पत्राबरोबरच त्याचीहि कुठें धासलात लागली

टिळकांच्या चरित्रात मला एक गोष्ट आढळून आली कीं कामाच्या भानडीपुढें त्याना मानापमानाची पर्वा नमे तशीच कीर्तीचीहि पर्वा नसे माझें चरित्र घडलें तसें लिहा हें सांगतांना त्यांना हेंच सागायचें होतें कीं माझ्या दोषावर मुळींच पांघरूण घालू नका. आपली एक गोष्ट म्हणजे त्यांच्या उच्च ध्येयानें परिपूर्ण अशा चरित्राचा परिणाम दुसऱ्यावर फार चटकन् होत असे नाहींतर नारायणराव गोखल्यांची मुलगी भंग्याचें काम इतक्या आनंदानें व उत्साहानें करण्यास तयार होणें शक्यच नव्हतें. महाराचा तुकडा कोठें शितोडा अंगावर उडाल्याचा भास झाला तर साऱ्या जन्मभर स्वत ला व घरांतील सगळ्यांना मास्या वडिलांनीं घासून पुसून घेतलें होतें. त्याच पित्याची मी कन्या वाईस भंग्याच्या घरचें अन्न खावें काय नि नगरच्या दवाखान्यात हलकीं सफाईची कामें करायला धावावें काय ! पण झाल वाणायचें झालें तर तें टिळकांनाच वाणलें पाहिजे ते माझे या बाबतींत गुरु होते त्यांनी मार्ग दाखविला कीं त्या मार्गानें डोळे झाकून बेधडक पळण्याचें काम मात्र माझें असे मला जर काहीं यशाचा वाटा असेल तर तो त्यांनीं मार्ग दाखविल्यानंतर न कचरता त्यावरून बेधडक जाण्यांत आहे एवढेंच.

---

-११-

# राहूरी

येथें बरी झाली. प्लेग हटला. कँप उठला. आम्ही घरीं आलों. घरीं आल्यावर मीं आमच्या घरापुढें सुंदरसा बगीचा केला. पन्नास कुंड्या आणविल्या. झाडें लावलीं. आमची बाग मोठी डौलदार दिसूं लागली. पण आमचा डौल कधींच टिकणारा नसल्यानें लौकरच टिळकांनीं ह्या सर्व कुंड्यांची खैरात करून टाकली. राहूरीचे मिशनरी डॉ. बालंटाईन रजेवर जायला निघाले होते. त्यांच्या कामावर टिळकांची नेमणूक झाली व जायच्या आधीं टिळकांनीं दारापुढच्या सर्व कुंड्या देऊन टाकल्या !

राहूरी गांव आम्हांला फार आवडलें. टिळक म्हणत असा गांवीं खांव रानांत मला जर एकान्तस्थळीं घर बांधून राहातां आलें तर मी कितीतरी ग्रंथ लिहीन. डॉ. हेन्री फेअरबँक नांवाचे मिशनरी येथें आमच्याकडे आले असतां टिळकांनीं आपल्या घराची कुरकूर त्यांच्या जवळहि केली. फेअरबँकसाहेब म्हणाले, "टिळक, मला कांहीं पैसे मिळायचे होते. पण मीं त्यांची आशा सोडून दिली आहे. जर हे पैसे मिळाले तर मी तुम्हांला तुम्ही म्हणतां तसें रानांत घर बांधून देईन. मग तुम्हांला पाहिजे तेवढी ग्रंथरचना तुम्ही करीत बसा." टिळकांनीं व डॉ. फेअरबँकसाहेबांनीं नंतर एकत्र बसून देवाची प्रार्थना केली व तो विषय तेवढ्यावरच राहिला.

तिसऱ्याच दिवशीं साहेब आले व सांगूं लागले, "टिळक, झालें तुमचें झोपडें तयार. मला आज पैसे आले. चला तुम्हांला कोठें जागा पाहिजे ?" दोघेजण राहूरीपासून मैल दीड मैलावर गेले. डॉ. बालंटाईनचें एक शेत होतें. तें ठरविलें. डॉ. बालंटाईनची संमति मिळविली व तें शेत २००–२५० रुपयांना खरेदी केलें !

मला जेव्हां हें समजलें तेव्हां आमचा मोठा खटका उडाला. घर बांधून बांधायचें मग तें गांवांत बांधायचें का दूर रानात ! तेथें सोबत नाहीं, शेजार नाहीं, पाणी नाहीं. अडीअडचणीला हाक मारली तर ओ द्यायला कोणी माणूस नाहीं. टिळक म्हणत, "तुला कांहीं कळत नाहीं व मीं कांहीं करायला घेतलें

कीं तूं येथें हटून मोडा घालणार हें टाळलें. पाणी वाहून आणावें येईल, सोयतीला कुर्री ठेवतां येतील आणि माणसांना काय करायचें ? तूं मला हाक मार, मी तुला हाक मारीन."

इकडे घर बांधायला सुरुवातहि झाली. साहेबांनीं स्वतः हातांनीं ह्या घराचें काम इतर मजुरांबरोबर केलें ! पाण्याची मसक, खाण्यासाठीं मेट, डोक्यावर सावलीसाठीं छत्री अशा थाटांत फेअरबँकसाहेब तेथें जाऊन काम करीत. त्यांनीं एक मिनिट फुकट घालविलें नाहीं. तेथें पाण्याचा टिपूस नाहीं कीं झाडाची छाया नाहीं. ऊन म्हणतें मी. छत्री पण तीहि वाऱ्यानें उलटायची. मी म्हणें, 'साहेब, काय हा तुम्हांला त्रास.' ते म्हणत, 'बाई, कांहीं हरकत नाहीं. हें सर्व मलाच केलें पाहिजे. दिवकांना कांहीं समजत नाहीं.' पांचशें रुपयांच्या जागीं हजार रुपये खर्च झाला व घर स्वतः मेहनतीनें बांधलें असल्यानें दोन हजारांचें झालें. त्याचें काम त्यानेंच करावें हें खरें. एक महिन्यांत घर तयार झालें. पण घरभरणीसाठीं आमच्याजवळ कुठें काय होतें ? घर साहेबांनीं तयार करून आमच्या स्वाधीन केलें. मग उसने पैसे आणून आम्ही घरभरणी करून नवीन घरांत राहूं लागलों.

जमीन नांगरून घेतली. एकानें सांगितलें, 'साहेब, येथें कपाशी फार चांगली येईल.' कपाशी पेरली. वीत वीत झाडें आलीं. चार दिवस पाऊस पडला नाहीं. दुसरा म्हणाला, 'अहो साहेब हें काय केलेंत ! पाऊस नाहीं, पाणी नाहीं. कपाशी कशी होणार ? ह्यांत हरबरा करा.' झालें ! दुसऱ्या दिवशीं गडी लावून कपाशी उपटून टाकली व पुन्हा जमीन नांगरली ! तेथें दोन पायल्या हरभरे पेरले.

कामाचा राजीनामा दिला व त्यांच्या भोवतीं व्हालंटिअर्स जमा होऊं लागले. एका व्हालंटिअरनें तर सहकुटुंब आमच्या घरीं ठाण दिला. कुटुंब सहाच माणसांचें होतें! शेतावरील चार गडी, राखणदार व त्याचें तीन बायकांचें कुटुंब असा त्या रानांत मोठा जनसमूह गोळा झाला होता. डॉ. ह्यूमसाहेबांनीं टिळकांच्या ह्या नव्या वृत्तीला आळा घातला नाहीं. पण तुपाचे तुरे लाल, पाईचे पुरे हाल ही स्थिति त्यांना माहीत असल्यानें त्यांनीं परस्पर ट्रॅक्ट सोसायटीकडे खटपट करून त्या सोसायटीचें १०० रुपयांचें काम त्यांना देवविलें. इकडे ते फुकट काम करीत व चरितार्थासाठीं ट्रॅक्ट सोसायटीच्या कामाबद्दल त्यांना शंभर रुपये मिळत. काम मात्र दुप्पट पडूं लागलें. पुन्हा जरा सुरळीत चालूं लागलें. पण शंभर रुपयांना शंभर वाटा ह्या होत्याच. टिळकांनीं आपल्या व्हालंटिअर्सची एक तांतडीची मीटिंग बोलावली. एकदा सतरच्या चार व्हालंटिअर्सची गाडी चुकली,— का चुकली देव जाणे! त्यांनीं चार भाड्याच्या सायकली चारीं चार आणेप्रमाणें करून सायकलवरून ते राहुरीला आले! व जातांना भजनाबळ पगारांवडे जे पंधरा वीस रुपये उरले होते ते सगळे सायकलभाडें म्हणून घेऊन गेले!

घरीं सहकुटुंब राहिलेला व्हालंटिअर टिळकांची हजामत करी. त्याबद्दल टिळक त्याला चार आणे देत. पुढें पुढें तो आपल्या स्वतःच्या मुलांच्या हजामतीचेहि पैसे टिळकांकडे मागूं लागला व टिळक त्याला ते देऊंहि लागले! एक दिवस त्यांना मीं साफ सांगितलें कीं मी हे पैसे देणार नाहीं. हा कसला व्हालंटिअर कीं आपल्या स्वतःच्या मुलाच्या हजामतीचे पैसे तुमच्याकडून उकळतो!

राहुरीसच टिळकांची दीक्षा झाली. पुष्कळ पाहुणेमंडळी आली होती. पण टिळकांचें घरात काहींच लक्ष नसल्यानें नेहमींप्रमाणें माझी तारांबळ उडाली. दीक्षा झाली. पाहुणे गेले.

रानांत घर बांधल्याबद्दल दुसऱ्या दिवशीं टिळकांचा व माझा पुन्हा खटका उडाला.

" आधींपासून व्यवस्था नसली म्हणजे हा असा त्रास होतो पाहा. "

" कोणता त्रास? मला तर नाहीं कांहीं त्रास वाटत विशेष."

" तुम्हांला नाहींच हो त्रास झाला. पण आम्हांला पाहा किती त्रास झाला तो."

" तूं त्रास करून घेतेस त्याला काय इलाज? पण त्रास न करून घेतला तर कांहीं राहातें का? वेळेला सर्व कांहीं होतें."

"सगें काय होतें ! पाण्याची देखील सोय नव्हती केवढी पाण्याची लूट पडली. मी आधींपासून सांगत होतें अशा जागीं घर बांधू नका म्हणून ; चोरांचा त्रास, माणसाची वाण, पाण्याचा दुष्काळ !"

"पाण्याचा दुष्काळ? चिमबाबा जा रे टिकाव पावडें. आपण विहीर खणू !"

चिमबाबा आधींच फाकडा, त्यांत तीन जागीं वाकडा, तो कमरेवर हात देऊन त्याच्यापुढें का वासून उभा राहिला !

"साहेब, ह्या जागीं पाणी लागत नाहीं"

"लागत नाहीं म्हणजे काय? चल मी सांगतों तेथें टाक टिकाव !"

चिमबाबा काय बोलणार, हुकमाचा ताबेदार, त्यानें टिकाव पावडें आणलें व टिळक त्याला घेऊन विहीर खणण्यास निघाले ! घरापासून वीसबारा हातावर विहीर खणण्यास सुरवात झाली. टिळक व चिमबाबा खणीत. मी, दत्तू, वारा आम्ही माती वाहू लागलों पाहुणेराहुणे कमरेवर हात देऊन आमची मजा पाहात. येत थोडें थोडें करतां कमरेइतकी विहीर खणली आमच्या विहिरीची बातमी हां हां म्हणता चहूकडे पसरली. एक दिवस बेलदार आले त्यांच्याशीं टिळकांनीं दहा आणे हमालाची बोली केली व ते पुढें काम करू लागले ही बातमी ऐकताच काहीं मित्रांनीं धावत येऊन तीं माणसें कामावरून घालविलीं तेवढ्या वेळांत त्यांची गुडघ्याइतकी विहीर खणूनहि झाली होती, पण त्या तेवढ्याची खोदाई हमालाच्या हिशेबानें जेव्हा काढण्यांत आली तेव्हा टिळकांच्या ध्यानांत आपली चूक आली त्यांना वाटलें होतें कीं सगें विहीर एक हमालभर खोल गेली कीं १० आणे झाले पण एक हमाल म्हणजे एक घनफूट असा तो हिशेब होता त्या हिशेबानें भलतीच रक्कम होऊ लागली त्याच दिवशीं पगार आला होता ह्या बेलदाराची कसोटी समजूत करण्यांत आली तरी त्यांनीं चार तासांत पंचेचाळीस रुपये नेले ! मग आमच्या त्या हितचिंतकांनीं दुसरीं माणसें आणून दिलीं विहीर एक पुरुष झाली कीं १० रुपये, दोन पुरुष खोल झाली कीं १५ रुपये असा त्याचा चढता पण आटोक्यांतला हिशेब होता पाच पुरुष खोल गेल्यावर विहीरीला पाणी लागलें व तें अगदीं भरपूर व गोड होतें

राहुरीसच टिळकांनीं पुष्कळ भजनें व अभंग लिहिले एक दिवस टिळक कोठें ख्रिस्ती मंडळीसह फिरायला गेले असतां तिकडून एक दिंडी आली

